जुन्या पिढींतील साहित्यसेवक व कराचींतील मराठी साहित्यवर्धक

**श्री. रामचंद्र आत्माराम उर्फ भाऊसाहेब दोंदे**

उपाध्यक्ष, महाराष्ट्र मित्र मंडल

कराची

यांस

सा

द

र

|

# आभार

'काजवे' या पुस्तकांतील बहुतेक लघुलेख कराचीच्या सिंध मराठा साप्ताहिकांत, वैनतेय पत्रांत व मनोहर मासिकांत गेलीं तीन चार वर्षे प्रकाशित होत होते. या कालिकांच्या संपादकांचा मी आभारी आहें.

महाराष्ट्र प्रकाशन संस्थेनें प्रकाशन हातीं घेतल्यानें जें 'कूजन' पूर्वी मुख्यतः कराचीसारख्या दूर ठिकाणींच ऐकूं आलें त्याचे पडसाद आतां महाराष्ट्रांतहि ऐकूं येतील. या संस्थेचा मी एतदर्थ ऋणी आहें.

१५-९-३७ —शंकर साठे

## लेखकाचें पूर्वप्रकाशन

मंजूषा } गद्यगीत संग्रह
पदवी }

भ्रष्ट देवालय { नाटिका
बाबांची शिस्त {

**आगामी**

मंदिरीं—गद्यगीत संग्रह

# का ज वे

## आनंद झरी

खरें विचारलेंत तर ह्या जगांत तिच्या इतका आनंद मला दुसऱ्या कोणाकडूनही मिळत नाहीं आणि हें सांगणें मोठ्या शरमेचें आहे असें मला वाटत नाहीं. तुम्हांला नाहीं का तुमची पत्नी आवडत? तुम्हांला नाहीं का तिच्या संगतींत आनंद होत? लोक हंसतात म्हणून तुम्ही घेतला आहे का संन्यास? मग खरी गोष्ट सांगण्यास लाजण्याचें मला तरी काय कारण आहे?

आतां एवढी गोष्ट खरी कीं तुमची ती कोण म्हणून तुम्हांस प्रश्न केला तर पांच पन्नासांची तुम्ही साक्ष काढाल. मला तसें कांहीं करतां येणार नाहीं. तिच्याशीं लग्न होऊन दहा वर्षें झालीं, नाहीं म्हटलें तरी तीन चार अपत्यें झालीं. मी कुणालाच तिचें नांव सांगितलेलें नाहीं. आणि सांगावें तरी कसें? उद्यां तुम्हीच म्हणाल–जिला बोलतां येत नाहीं, जिला दिसत नाहीं, स्वतः होऊन चालतां येत नाहीं असल्या आंधळ्या पांगळ्या आणि थोट्या अशीच्या संगतींत ह्याला आनंद तरी कसा होतो? धाकटा गंपू तर टुणकन उडी मारून सांगेल कीं, “अहो मामा, परवां तर दौतींत जीभ बुडवून शाई पितांना मी तिला चोरून पाहिलें होतें!”

आणि मग तर तुम्हीं तिला वेडीच ठरवाल आणि असल्या वेडीशीं ज्याची लग्नगांठ त्याचा तुम्हीं किती उपहास कराल?

पण मी तुम्हाला मनांतील सांगूं का ? ती माझी आनंद झरी आहे. दुःखाच्या प्रचंड गिरीवरून घाट चढतां चढतां लाभलेली ही वेणु माझें आनंदाचें स्थान आहे. तुमच्याशीं मी तासचे तास बोलेन, एखाद्या सभेंत वक्तृत्वानें तुम्हांला हंसवीन अगर रडवीन, वाचनालयांत म्हाताऱ्या वा बालग्रंथांशीं कलाकचे कलाक गप्पा मारीत बसेन, पण प्रत्येक वेळीं तिची आठवण ताजीच असेल. तिच्या संगतींतील एकांताचें सुख स्वर्गसुखापेक्षां मी मोठें समजतों; आणि या एकांतांतील काळ जेवढा निर्मितिप्रभव झाला आहे तेवढा तुमच्या सभांतील, चळवळींतील काळ झालेला नाहीं.

एवढ्या गोष्टी—आणि त्याही प्रामाणिकपणें आड-पडदा न ठेवतां सांगितल्यानंतर खरे रसिक कबूल करतील कीं—

माझी लेखणी मला आनंद-झरी आहे व तिची योग्यताही माझ्या-पुरती अनन्य होय !

## आत्मपूजा

त्यानें आज तो फोटो दहादां बाहेर काढला व दहादां कपाटांत ठेवला. फोटो बाहेर काढावा, खुर्चीवर बसावें, मनमुराद न्याहाळावा, थोडेसें हंसावें, फिरून नीट बंद करावा व ठेवून द्यावा, परत कांहीं तरी वाचल्यासारखें करावें, अस्वस्थपणें तो फोटो बाहेर काढावा व परत बारकाईनें पहावा, हंसावें असा त्याचा खेळ आज कितीतरी वेळ चालला होता.

असें होतें तरी काय त्या फोटोंत ? विशाल भाउप्रदेशावर प्रभातींच्या निष्कलंक रम्य क्षितिजावर शुक्राची चांदणी चमकावी तसा चमचम-

णारा कुंकुम तिलक, त्याखालीं हृदयाची पकड घेऊं पहाणारे दोन सुंदर डोळे, यौवनाशीं खेळीमेळीनें वागणाऱ्या हास्याला घट्ट मिटलेल्या ओठांनीं पकडल्यामुळें पडलेल्या खळया, वक्षःस्थलावरून सोडलेली वेणीची काळी नागीण हें किंवा असेंच चेतोहर दृश्य तर त्या फोटोंत नव्हतें ना ?

खरें म्हटलें तर असें कोणतेंच दृश्य त्या फोटोंत नव्हतें. चार चौघांसारख्या चेहऱ्या मोहऱ्यांच्या एका तरूणाचा तो फोटो होता. दहादां दहादां पहावें असें त्यांत कांहींच नव्हतें. मग त्या फोटोंत तो इतका कां बरें दंग झाला होता ?

त्याचें कारण एकच होतें. तो पहिलाच काढलेला फोटो होता व तो त्याचा स्वतःचाच होता !

मला माहीत आहे कीं या आत्मपूजक तरुणाला वेडा म्हणणारे लोक थोडे थोडके मिळणार नाहींत. पण बारकाईनें पाहिलें तर आत्मपूजक नाहीं कोण ?

' सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ' असें म्हणणारा कृष्ण हा एकटाच कांहीं आत्मपूजक नाहीं. जगांतील कोणतीही व्यक्ति मग ती ख्रिस्त असो वा बुद्ध असो, टॉलस्टॉय असो कीं गांधी असो, प्रायः आत्मपूजक असते. मला वाटलें, मला पटलें, मी केलें हाच त्यांच्या आचरणाचा मार्ग आहे. मग त्याला ते बोध म्हणोत, अन्तर्ध्वनि म्हणोत वा ईश्वरी संदेश म्हणोत. हीं आत्मनिष्ठेचीं वेगवेगळीं नांवें मात्र आहेत.

खरें पाहिलें तर या सर्व व्यक्ती आत्मपूजकच होत्या. तुम्हीं आम्हींही त्याला अपवाद नाहीं. मी म्हणून कोणी व्यक्ती आहे,

चराचर विश्वांत तिला एक विशिष्ठ स्थान आहे. ती कांहीं उगाच जन्माला आलेली नाहीं. चाकाच्या अऱ्याप्रमाणें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष असें या जगच्चक्रांत आपलें कार्य आहे याची आपणांला क्षणोक्षणीं जागृत जाणीव असते. किंबहुना विचारशक्ती न गमावलेल्या प्रत्येक स्थीर बुद्धीच्या माणसाला ही जाणीव असतेच, आणि आपला आत्मविश्वास जेवढा दांडगा तेव्हढी आपली आत्मनिष्ठाही दांडगी असते. आणि आत्मनिष्ठा ही एक प्रकारची आत्मपूजाच होय.

म्हणूनच आत्मकृती, आत्मस्वरूप व आत्मविचार हे आपणांला प्रिय वाटत असतात व आपण त्या प्रमाणांत आत्मपूजकच असतों.

मग त्या तरुणाला दोष कां द्या ?

## आरसा

त्यानीं माझें नाटक बसवलें तें मला न सांगतां न पुसतां. पण तें चांगलें झाल्याचें व आपणच त्यांतील मुख्य भूमिका घेतल्याचें त्यानें सांगतांच मात्र मला चुटपुट लागून राहिली. मी म्हटलें, ' गड्या, नाटक तर मला चुकलें पण तुझ्या भूमिकेपैकीं आठवतो कारे तुला कांहीं भाग ? ' तो म्हणाला, ' हो हो, महाराचा पोर भिक्षा मागत येतो त्या वेळीं त्याच्या तोंडीं तूं घातलेली करुण भैरवीच मी म्हणतों पहा."

एवढें म्हणून त्यानें आपल्या रसाळ आवाजांत त्या भिकाऱ्याच्या तोंडीं घातलेल्या चार साध्याच ओळी इतक्या बहारीनें म्हटल्या कीं माझें मलाच आश्चर्य वाटलें. कारण रागदारींची माझी माहिती नुक-

त्याच ‘ श्रीगला ’ बसलेल्या मुलाला मोरोपंताच्या काव्याविषयीं असावी तितकीच होती. मी गाणें लिहिलें तेव्हां ही भैरवी आहे कीं दुर्गा आहे हें मला माहीतही नव्हतें.

भिक्षा घाला कुणी मजला ।
भिक्षा घाला कुणी—

असा त्या पदाचा आरंभ होता, पण या साध्या ओळीच भैरवीत आहेत हें त्यानें सांगितलें व आपल्या मधुमया वाणींत आलापिलें तेव्हांच मला कळलें. गद्य पद्य यांच्या व्याख्या प्रथमच शिकलेल्या एका मुलाला आपण गद्यांतच बोलतों हें ऐकतांच जें आश्चर्य वाटलें अशी आख्यायिका आहे त्यांतलाच हा आनंद होता.

खरें म्हटलें तर सौंदर्यसंपन्न वन्य युवतींना-कीं ज्यानीं कधीं आरसा देखलाच नाहीं त्यांना-जर तुम्हीं सुंदर आहांत असें म्हटलें तर आत्मप्रतिदर्शनाभावीं आत्मसौंदर्याचा बोधच होणार नाहीं. बोलपट निघाले नसते तर अनेक अभिनय कुशल नटांना आत्मकृति-दर्शनाच्या आनंदाला मुकावें लागलें असतें. ही जी त्यांची गत तीच तुमची आमची.

एवढ्याचसाठीं आपणांला आरसे लागतात. सौंदर्यसंपन्न ललनांना आपण सुंदर तरुण असतों तर काय बहार होती असें वाटतें. तर उलट सुंदर तरुण स्वतःचें रूप आरशांत पहातांना आपण स्त्रियांना कसे दिसूं याचाच विचार करीत असण्याचा संभव अधिक !

आणि या सर्वांचें कारण एकच. निजानंद हा सापेक्ष आहे. केवल एकम् आपणांला आनंद देऊंच शकणार नाहीं. मी व तूं हें द्वंद्व निदान आनंदसाधनेला आवश्यक आहे.

आणि म्हणूनच ही उणीव आपण आरशांनीं भरून काढतों. चित्रकाराला प्रदर्शन, लेखकांना अभिप्राय, नाटय लेखकांना रंगभूमी हे सर्व वेगवेगळया प्रकारचे आरसेच आहेत. हे नको म्हणून चालणार नाहींत, कारण आत्मकृतीचा पूर्णानंद हा स्वमताइतकाच पररस ग्रहणावरही अवलंबून असतो. म्हणूनच तर हे आरसे हवेत.

आणि मीहि ती भैरवी ऐकतांच जो इतका आनंदित झालों, त्या भरांत त्याच्या पाठीवर मोठ्यानें थाप दिली व त्याचे हात दुखूं लागण्या इतके दृढ हस्तांदोलन केलें. त्याचें कारण हेंच कीं त्याचा आवाज हा माझ्या गीताचा आरसा होता.

## पूर्व स्मृती

तो एक सारखा हंसूं लागलेला पाहून मला राग आला व कोणाला नाहीं येणार? माझें बोट करकरून चावलें गेलें खरें पण त्यांत एवढें हंसण्याजोगें काय होतें? शिवाय आपण चांगली वीस मिनिटें एक मूक नाट्य अभिनय पहात होतों असें जेव्हां तो म्हणाला तेव्हां तर मी आश्चर्य चकितच झालों. कारण कोकणांतून माझ्यासाठीं त्यानें आणलेल्या चार गऱ्यांच्या पाकळ्या खातां खातां मी सद्यःकालाला इतका विसरलों होतों कीं माझ्या जीवनांतील सोळा वर्षे एकदम गळून पडून दहा वर्षांच्या बाल्यांत मी गेलों केव्हां व कसा हें मला समजलेंच नाहीं. आणि चावल्या गेल्यामुळें रडणाऱ्या बोटानें मला दाढी मिशा फुटलेल्या यौवन कालांत आणलें नसतें तर त्या बाल्याच्या सुखसागरांत पोहत पोहत मी इतका लांब गेलों असतों कीं तरुणपणचें बंदर फिरून लाभतेंच ना!

म्हणजे त्याची झालीच गंमत अशी. पहिली पाकळी दाढेखालीं

घालतांच माझ्या डोळ्यांना आमच्या घरामागच्या फणसाचा तो भव्य वृक्ष एकदम दिसूं लागला. एकदां वाटलें कीं त्या लंगोटीयार दोस्तानें बरींच वर्षे न भेटल्यामुळें या पाकळीपाकळीवर स्वदस्तुरचें स्मृति पत्र लिहून माझेकडे पाठविलें असावें. त्याची आठवण म्हणजे बाल्यांतील अनेक हूड, खोडकर कृत्यांची आठवणच ती ! लहान मुलानें प्रेमळ दादाच्या कटीखांद्यावर चढून त्याची शेंडी पकडावी त्याप्रमाणें वडील माणसांचा डोळा चुकवून अनेक युक्त्याप्रयुक्त्या योजून आमचा बाळ-गोपाळांचा कळप या फणसाच्या वक्र बाहूवर चढावयाचा, वर ‘ हूप हूप ’ करून गर्जना करणाऱ्या हुप्यांना मुसळ दाखवून पळवून सोडावयाचा व दादाच्या खिशांतील चाकोलेट खाणाऱ्या लहान भावा-प्रमाणें फणस—दादाच्या हातांतील चांगले पिकलेले फणस काढून झाडावरच्या झाडावर फन्ना पाडावयाचा व जीं छोटीं मानवी मर्कटें ‘ मालाऽदेऽऽ’ करून खालीं तोंड वेंगाडत असावयाचीं त्यांवर क्वचित आठळा तर क्वचित गरे फेकून त्यानां ‘ यॉंव यॉंव ’ माकडा आम्ही खाऊं गरे, आठळांनीं तुमचा तोबरा भरे ’ या काव्यमय वाणींत वेडवावयाचा.

या, या सर्वस्मृती आज जसजशा डोळ्यांपुढून जाऊं लागल्या तसतशा आधुनिक जीवनाच्या पाकळ्या गळून हुरहुरीचें बोट मात्र चावलें गेलें. लहानपण दे गा देवा म्हणून-बाल्य लाभतें तर तें आम्हीं केव्हांच मिळविलें असतें. पण गेलें बाल्य परत लाभणें नाहीं म्हणूनच पूर्व स्मृती ही अमृत सरिता वाटूं लागते. व जोंवर ही स्मृती ताजी तोंवर सांप्रतच्या रुक्ष जीवनाचा विसर. पण या पूर्व स्मृतीची निर्विकल्प नव्हे तर सविकल्प समाधी सदा कुठची लाभायला ?—

आणि म्हणूनच घडीभर लाभलेली पूर्व स्मृती हीच आनंदमया घटिका होते. तुमचा नाहीं का असा अनुभव ?

## गत दृष्टी

मी जसजसा मोठा होऊं लागलों तसतसें मला वाटूं लागलें कीं बाळपणींची सौंदर्य पुलकित सृष्टी कांहीं आतां राहिलेली नाहीं. अनंत नीलिमेंतून लक्षावधी तारे गळून पडत असल्यामुळें आकाशही दिवसें-दिवस गतप्रभ होत चाललें आहे. चंद्राचें शांत पण सुंदर तेज आतां पहिल्यासारखें राहिलें नसून तोही निस्तेज व पंडुरोग्यासारखा फिक्का दिसूं लागला आहे.

पण माझ्या लहानपणीं असें नव्हतें. नुकत्याच खापरांतून काढलेल्या जोंधळ्याच्या पांढऱ्या शुभ्र लाह्या सदऱ्याच्या पदरांत घेऊन आम्ही बालमंडळी आकाशाच्या चाळणींत टच टच नाचणाऱ्या अगणित लाह्यांची अशक्य गणना करीत बसूं आणि सभोंवरच्या टेकडीवर सप्तर्षींचा पतंग उडतांना दिसे व झाडाआडून मृगाचेंही दर्शन होई. चिमुकला चवथीचा चंद्र आपलीं खेळणीं इतस्ततः भिरकावून वांकूड शिंपी टोपी घालून कधीं मेघांच्या पटांत तोंड खुपसून तर कधीं मिष्किल हंसत बसलेला दिसे.

पण तें सौंदर्य आज राहिलेलें नव्हतें. आजची ही सृष्टी नवयौवन-संपन्न वासक सज्जा नव्हती तर वृद्धा दिसत होती. हळु हळु तर ही जरा वृक्ष वनस्पतींवर पुष्प मुकुलांवर—ही पसरलेली दिसूं लागली. तेव्हां तर मी निश्वास टाकून म्हटलें, 'अरे, अरे ! अवघ्या ८–१० वर्षांत जर ही पृथ्वीची इतकी जरठा दिसूं लागली तर पुढील पिढीची ही पृथ्वी एक वेळ सौंदर्यशालिनी होती यावर विश्वास तरी कसा बसावा?'

आणि हे विचार मनांत येऊं लागतांच फाजिल उपयुक्ततावादी बनलेल्या सांप्रतच्या जडवादी जगाप्रमाणें मीही आनन्देन जातानि

जीवन्ति, आनन्दें: प्रयन्त्यभिसंविशन्ति ' या उपनिषद्वाणीवर विश्वास ठेविनासा झालों.

पाकळ्या गळून पडलेल्या फुलाच्या देठाप्रमाणें माझें आनंदाचें तत्त्वज्ञान गळून पडून मी निराशवादी बनत चाललों.

पण एक दिवस चमत्कार झाला. मी माझ्या एका नैत्रवैद्य मित्राकडे गेलों असतां तो भिंतीकडे बोट करून म्हणाला; ' मित्रा, तें जपानी सूर्यफुलाचें चित्र फार सुंदर दिसतें नाहीं ?' ' कोणतें चित्र ? ' मी पुसलें, कारण त्यानें बोट केलेल्या बाजूला भिंतीवर पुसट पुसट रंगांचे हिरवे, पिवळे ठिपके मात्र मला दिसत होते. त्यानें परत परत सांगितलें असतांही त्या पुष्पसौंदर्याची मला खात्री होईना म्हणून जवळ जाऊन खुर्चीवर उभा राहून खात्री करून घेतली. खरेंच तें चित्र अप्रतिम होतें. मी मित्राकडे येतों तों त्याचा चेहरा गंभीर दिसत होता. तो म्हणाला ' मित्रा, तुझी दृष्टी फार संकुचित झालेली दिसते. चल तुझे डोळे तपासून मी चष्मा देतों व तो चष्मा हातीं येतांच दुसरा चमत्कार झाला.

सृष्टीची जरा नाहींशी झाली. ती बालपणीं जशी यौवनसंपन्ना व सौंदर्यमया दिसत असे तशीच दिसूं लागली वृक्षवनस्पति, फुलें, पांखरें टवटवीत दिसूं लागलीं व सृष्टि आनंदमय आहे हें मला पटूं लागलें, व ' कोह्येवान्यात् कः प्राण्यात् यद् एष आकाश आनंदोनास्यात् ? ' याचा मला साक्षात्कार घडला.

आणि ही क्रांती घडतांच एक तत्व मला कळलें कीं सृष्टी ही आहे तशीच आहे. ' पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावाशिष्यते ' हें तिचें स्वरूप वेद वा उपनिषत्कालीं होतें तसेंच आजही आहे. पण आपली दृष्टीच आकुंचित झाली आहे. ही गतदृष्टी लाभेल तत्क्षणीं आपणही म्हणूं कीं—ही सृष्टि आनंदमयाच आहे.

# चांदुला

ते दिवस मला अजूनही आठवतात. चूल पेटलेली आहे, लांकडे धगधगत आहेत, चुलीवरचा तवा लाल झाला आहे आणि त्याच्या शेजारींच आई, ताई, अगर एखादी वडील भावजय भाकऱ्या भाजत असून आम्हीं सर्व मुलें तिच्यासभोंवतीं मंडलाकार बसलों आहोंत. आज बालवीरांच्या छावणींत आग शेकोटीच्या भोंवती जेव्हां जेव्हां मी बसतों तेव्हां तेव्हां या जुन्या गोष्टींची माझी आठवण ताजी होते. आम्हीं 'वहिनी' एखादी गोष्ट सांग ना ग' म्हणून हट्ट धरावयाचा व तिनेंही पांचा बोटांनीं भाकरीच्या पिठावर थड थड ताशा वाजवीत म्हणावयाचें 'गोष्ट कसली भावजी, गाणेंच म्हणतें ऐका' एवढें म्हणून:—

भावजी भावजी संध्या करा
अर्धा उंदीर तोंडीं धरा
उंदीर म्हणतो हाय हाय
भावजी म्हणतात काय काय !

हा आपला नित्याचा छंद म्हणावयाचा व मीहि रागावून गट्टी फूऽऽकरून एकदम 'धूम जाव' च्या पावित्र्यांत बसावयाचा ! इतक्यांत तव्यावर टाकलेल्या भाकरीचा चर्रर्र असा आवाज यायचा व वहिनीहीं म्हणायची 'आतां कीं नई मी चांदुला करणार आहें चांदुला. एक माणूस रागावलं आहे आपलं ? तें कशाला खातं माझ्या हातचं ? हा चांदुला कुणासाठीं ? विनू, तुझ्यासाठीं ? नाहीं. मधू तुझ्यासाठीं ? छे छे जें कुणी फुरंगटून बसलें असेल ना त्याच्यासाठीं !'

एवढें म्हणतांच आम्हीही म्हणायचं, ‘ आम्हांला नको जा तुझा चांदुला ! ’

पण त्या वेळीं मनाची खात्री कीं हा चांदुला आपणालाच मिळायचा. आणि जर कां तो दुसऱ्याला मिळाला तर मग ना जेवण ना खाण !

पण आज अजूनही वाटतें कीं त्या चिडण्यांत, त्या रागावण्यांत त्या भांडणांत एक सुख होतें. आज अनेक सुखें प्राप्त होतील पण बालपणींच्या त्या चांदुल्याची गोडी कांहीं दुसऱ्या कशाला येणार नाहीं. ती चूल, ती सायंपरिषद, तें रुसणें फुगणें, रागावणें रडणें सर्व कांहीं आनंदमय, तो आनंद आज उरला नाहीं.

आजच्या वयांत एखादा सन्मानार्थ चहापान समारंभ होईल, तसेंच कोणी आवडीचें माणूस असलें तर तें चहा प्यायलाही बोलावील वा मनांतच आलें तर ताजमहालांत जाऊनही भोजन करतां येईल पण एक खरें कीं:—

बाल्यांतील त्या निर्व्याज् सुंदर भावानें वाढलेला एखाद्या आईच्या, एखाद्या ताईच्या वा एखाद्या बहिणीच्या प्रेमळ हातचा चांदुला परत मिळणें नाहीं !

## साध्य-साधन

त्या मुलाचें मला एक नवलच वाटलें. त्यानें दुसरे दिवशीं पुस्तक आणलें तें रबरानें घासून पुसून लख्ख करून. आदले दिवशीं मी पुस्तकाच्या मार्येत दिलेलीं टांचणें, केलेल्या अधोरेखा, टिपा व टिपणें दुसरे दिवशीं त्यानें चट्टदिशीं नाहींशी केलेलीं. मी म्हटलें

'भल्या गृहस्था, एवढा वेळ मोडून व एवढा श्रम करून जीं मी तुला टाचणें टिपणें दिलीं तीं अशीं बेपत्ता करण्याकरितांच का ? सर्व पुसून जो तूं जणू त्या गांवचाच नाहींस अशा थाटांत आलास त्याचें कारण तरी काय ?' तो विद्यार्थी म्हणाला, "टाचणें टिपणें महत्त्वाचीं होतीं सर्व कांहीं खरें. पण पुस्तक खराब होतें ना ? त्यावर जर अशा खाणा खुणा केल्या तर तें कोरें करकरीत कसें राहील ?"

आणि कोरें करकरीत पुस्तक दिसावें म्हणून त्या पठ्यानें अभ्यास चिन्हें नाहींशी केलीं होतीं !

पण त्यालाच कांहीं हंसावयास नको. कारण मुलाची प्रकृति बिघडेल म्हणून त्याला उन्हा वाऱ्यांत पायही टाकूं न देणारा अतिस्नेहशंकी बाप हीच गोष्ट करीत असतो व उन्ह वारा थंडी पाऊस यांचा मुळींच परिणाम न झालेला मुलगा शरीरानें नाजुक, मनानें भित्रा बनून केवळ चूलकोंबडा होतो. पोथ्यापुस्तकांतील सार न शिकतां त्यावर गंध फुलें घालून पुजेला लावणारी आजीबाई हेंच करीत असते व शरीर सुखाकरितां वस्त्रें वापरावयाचीं असतां भर उन्हाळ्यांत ब्लेझरचे कोट, स्टॉकिंग्ज व नेक्टाय वापरून गैरसोय सहन करण्यानें आपण हीच गोष्ट साधीत असतों. शरीर हें जीवनाचें साधन आहे हें विसरून त्याला फाजील जपण्यांत व त्याचें नाहीं नाहीं ते चोचले पुरवण्यांत आपण त्या मुलाचा वेडेपणाच अनुसरत नसतों तर काय ?

किंबहुना जगांतील सांप्रत असमाधान साध्यापेक्षां साधनालाच अधिक महत्त्व दिल्यामुळें उत्पन्न झालें आहे. पैसा हें सौख्याचें साधन असतां पैसाच सौख्याला लाथ मारून अनेकांचें साध्य होऊन बसतो.

पदवी हें ज्ञानप्राप्तीचें एक साधन असतां त्यालाच साध्य मानल्यामुळें अनेक पदवीधरांकडून ज्ञान दूरच रहातें. हीच गोष्ट अन्य क्षेत्रांत. म्हणूनच साध्य साधनांतील अंतर नीट समजून घेऊन साध्य प्राप्तीस्तव साधनाचा जास्तींत जास्त उपयोग करावा तेव्हांच आपण सुज्ञ ठरूं. नाहीं तर जीवनाचा ग्रंथ न हाताळतां, स्मृति रेखांकित न करतां कोराकरकरीत ठेवणाऱ्या त्या मुलांत व आपणांत अंतर तें कोणतें ?

## म्हातारी

त्या दहा वीस मुलांचा तो गलका, धांवपळ, मारामाऱ्या, कल्लोळ पाहून माझा मित्र म्हणाला, ‘ काय आहे बुवा त्या वीतभर पतंगांत व हातभर दोऱ्यांत ? पहा कार्टीं कशीं त्या दोन दमडीच्या मालासाठीं जीव तोडून धांवताहेत, एकमेकावर आदळताहेत आणि लढतातही आहेत.’

मी मित्राला उत्तर दिलें नाहीं व तितका अवसरही नव्हता. कारण ज्या पक्षानें प्रतिपक्षाचा पतंग तोडून त्याच्या आकाश उड्डाणी गर्वाला गोते खात खात धरणीवर आंग टाकायला लावलें होतें त्या पक्षाचीं तीं दहावीस पोरें त्यामागून आठदहा कुत्रे एखाद्या विजयी सैन्याप्रमाणें आनंदाच्या आरोळ्या देत देत प्रतिपक्षाचा पतंग घेऊन आमच्या आंगावरून निघूनही गेलीं व माझ्या मित्राच्या कपाळावर तुच्छतेच्या आठदहा आंठ्या अधिक उमटल्या. तो एकदां उपहासानें हंसला व आपल्या वयोवृद्ध, गंभीर व बाल्यगत आनंदाला पारख्या झालेल्या दृष्टीचा एक तुच्छता कटाक्ष त्यानें त्या पोरांवर टाकला.

पण या बाल्यसहज आनंदाला मी अजून मुकलों नव्हतों. वयो-

वृद्ध बाह्यांगाच्या आंत बाल्याच्या नवांकुरित शाखा अजून होरपळल्या नव्हत्या. अक्षय तरुण वटवृक्षाप्रमाणें बाल्याच्या परंपराप्राप्त पारव्या अजूनही जित्या होत्या, म्हणूनच माझ्या पोक्त मित्राला लाभलेल्या तुच्छता बुद्धीला माझ्या ठायीं स्थान नव्हतें. आपणही त्या आनंद मेळ्यांत नाचत, ओरडत, उड्या मारीत मिसळावें असें मला वाटूं लागलें.

आणि त्याच वेळीं आमच्या शाळेच्या वाटेवर लहानपणीं असलेलीं दोन कांटे सायरींची झाडें मला आठवलीं. या सायरीच्या शुभ्र वा रक्त सहस्रपरांगयुक्त गोंडेदार फुलांकरतां आम्हीं आमचा उबदार बिछाना सोडून पहांटेच्या प्रहरीं धांव घेत असूं व ज्या दिवशीं त्या मैत्रिणींचा कृपाप्रसाद कर प्राप्त होईल त्या दिवशीं सर्व दिवस तें मंगल चिन्ह जिथें तिथें नाचवीत असूं.

आणि याच सायरीवर रुपेरी कापूस धरला कीं दुपारच्या वेळीं ती खेळकर सायरी आपला रजत-रू-करंडक पटकन उघडी व वहात्या वाऱ्यावरून हजारों 'म्हाताऱ्या' मैलाच्या मैल पसरत. आणि या म्हाताऱ्या-कर्पास तंतूंच्या पुष्पाकार विमानांत बसून भिर-भिर भटकणाऱ्या अप्सरा-पकडणें, नव्हे पकडण्याकरितां रस्तोरस्तीं, डोंगरा खडकांवर, नाल्या वहाळांत, घरीं अंगणीं उड्या मारीत ओरडत भटकणें हा आमचा आवडीचा खेळ होता. आणि जो कोणी म्हातारी वरच्यावर, जमिनीला तिचा पाय लागण्यापूर्वीं पकडूं शके तो आमचा त्या दिवसा पुरता तरी राजा बने !

आनंदाची किंमत केवळ धन प्राप्तीवर ठरविणाऱ्या वयोवृद्ध मनोवृद्धांना हा धनाशा अनासक्त आनंद कसा लाभावा ?

## कोंबडा

'राजा कोणाला करावें ?' या प्रश्नाचा विचार करण्याकरितां उद्यां जर सर्व पक्ष्यांची सभा भरली व निर्णयाकरतां त्यांचें शिष्ट मंडळ माझ्याकडे आलें तर माझें उत्तर त्यांना चुटकीसरसें मिळेल. मग तें त्यांना अगर तुम्हांला पटो अगर न पटो, गरूड हें उत्तर असावें असें कोणालाही वाटणें साहजिकच आहे. कदाचित एखादा चित्रसौंदर्याचा भोक्ता मत्तमयूराकडे बोट दाखवील. पण नाहीं, माझें उत्तर कोंबडा हें आहे !

आणि हें उत्तर ऐकतांच पुष्कळांना आश्चर्य वाटेल. आपल्या दाराबाहेर दिलेल्या घरकुलांत राहून पहाट होतांच प्राचीन काळच्या राजे लोकांच्या पदरच्या भाटांप्रमाणें 'पहाट झाली हो महाराज' म्हणून ज्यानें बंदिजनाप्रमाणें आरवावें व चहाच्या वेळीं गरगरीत वाटोळें, उबदार व गुलाबी कुक्कुट फळ ज्यानें पुरवावें एवढीच ज्याची कामगिरी तो रा. रा. कोंबडा म्हणे पक्ष्यांचा राजा होणार ! वहावा रे कुक्कुट महाराज !

पण अतिपरिचयामुळें ज्याची आपण अवज्ञा व उपहास करीत असतों. त्याच या पक्षिराजाकडे जरा सौंदर्यग्राहक दृष्टीनें पाहिलें तर या राजपक्षाची यथायोग्यता पटणारी आहे. राजकुक्कुटासारखा अगर सकाळच्या सूर्य बिंबासारखा लाल व पुढें झुकलेला तुरा डोकीं खोवून व राजाच्या झग्याप्रमाणें निरनिराळ्या रंगाच्या छटांचा झुपकेदार पुच्छ पिसारा मिरवीत छाती पुढें काढून धीम्या व बेडर वृत्तीनें कोंबडा चालूं लागलेला श्रीकृष्णाच्या नजरेस पडता तर तो 'वैनतेयश्च

पक्षिणाम् ' असें न म्हणतां ' ताम्रचूडश्च पक्षिणाम् ' असेंच म्हणता. पण नंदाच्या घरीं गाईवासरांप्रमाणेंच कोंबडीं बाळगलेलीं नसावींत; एऱ्हवीं वैनतैयाला भलतेंच महत्त्व श्रीकृष्ण कधींच न देता !

आणि लाल बाशिंग डोक्याला बांधून जरीकांठीं उपरण्याचा शेवट मिरवीत जातांना या नवरदेवाला पाहून अनेक कुक्कुट वनिता भाळून जात असल्या तर नवल कसलें ?

पण कोंबडा हा केवळ डौलदार नवरदेवच नसून खरा क्षत्रिय आहे. उगाच नाहीं त्याला संस्कृतांत चरणायुध म्हणतात !

हा वीर फिरत असतां ताकद काय एखाद्या घारीची त्याच्या साम्राज्यांतील बारीकशा प्रजाजनाकडेही वक्र दृष्टीनें पाह्यची ! त्याचा वेष, त्याची चाल, त्याचा देह सर्वांची ढब मर्दानी थाटाची. आणि म्हणूनच त्यानें आपल्या उच्चश्रवानें रणभेरी फुंकली कीं जंगलचा बादशहासुद्धां शेपटाचें निशाण खालीं करून चौपायानें पळ काढतो.

आणि पक्ष्यांचा राजा केवळ कोंबडाच असें मी म्हणतों व माझ्या खोलींत लेर्थॉर्न जातीच्या कोंबड्याचें चित्र टांगलेलें असतें तें या साठींच !

## माऊ.

माझ्या जीवन सौख्यांत भर टाकण्याला जें जें कारण झालें आहे त्याची त्याची गणना करण्यास बसावयाचें म्हटलें तर माझें पहिलें बोट मला माऊकरतांच राखून ठेवावें लागेल. माऊला दिलेला हा मान केवळ भूतदयेच्या ऐस पैस नात्यावर दिलेला नाहीं. कारण भूतदयेचाच प्रश्न आला तर उडाणटप्पू मांजरापेक्षां गोगलगाईवरच

दया दाखविणें योग्य ठरेल. पण माऊचा मान हा त्यानें स्वकृतीनें मिळविलेला आहे, उपकारही नाहींत वा भलताच मोठेपणाही नाहीं.

आणि माझ्या जीवनांत एवढें श्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेण्याला माऊला कांहीं कमी प्रयास नाहीं पडले ! मी मधल्या सुट्टींत शाळेंतून घरीं येतांच आपल्या शेपटीची पताका उभारून घराच्या उंबरठ्यावरून आपल्या लाडीक, सकंप व गोड आवाजांत माऊच मला घरांत पान तयार असल्याची वर्दी देई. नंतर हातपाय धुवून पाटावर बसेपर्यंत मी आल्याची बातमी आईपर्यंत पोंचवून आपण माझ्या पाटावर बसून जागा राखून ठेवी. नंतरहि लोणी लावलेला भाकरीचा तुकडा चट्ट करून तोंड धुवून माझ्या पाठीच्या पर्वतावरून डोक्याच्या शिखरावर चढण्यांत व तेथील केस चाटण्यांत माऊंट् एव्हरेस्टवर चढाई करूं जाणाऱ्या जर्मन संशोधकांचा आनंद मानी. पाठीवरून हात फिरवतांच पाठीचा कणा उंटासारखा करून आपल्या खरखरीत जिभेनें माझें बोट घासून उपकाराची परत फेड करी. लिहावयाला बसल्यानंतर लेखणीच्या जिभलीवर पंजा मारून पुस्तक बिघडवण्याचा व्रात्य खेळ खेळणाऱ्या माऊला कंटाळून कलमदानावर ठेवलेली लेखणी दातीं पकडून तुरतुर धांवत सुटे व पाठीं लागलें असतां लेखणी टाकून दूरवर जाऊन आपल्या भाषेंत वेडावत बसे. कधीं कधीं मेजाच्या एका बाजूला अगर मांडीवर झोंपून गुर्र गुर्र आवाजानें आपला आनंद प्रकट करी व कधीं कधीं घरांत बेडकुळीशीं खेळून आम्हांला हसवून सोडी; या व अशाच अनेक खेळकर, खोडकर, आल्हादकारक लीलांनींच तें आमच्या हृदयाचा पगडा घेऊं शकलें होतें. जनूला थोडें थोडकें कां होईना दुखणें बाणें झालें कीं आम्हीं

२

घरांतलीं मुलें शेतामळ्यांतून दूरदूर जाऊन तुंबा माका आणण्यास आळस करीत नसू. आणि याचें कारण एकच होतें कीं माऊ आमच्या जीवनांत प्रत्यहीं आनंदाची भर टाकत असे. आजही या पूर्व स्मृति जाग्या होतांच माझ्या सौख्यांत भर टाकणाऱ्या माऊचें नांव घ्यावेसें वाटतें याचें कारण हेंच.

परंतु केवळ उपयुक्तावादी लोकांना हें मांजराला दिलेलें महत्व आवडणार नाहीं. हूं कीं चूं न करतां लादाव्या तितक्या गोण्या वाहून नेणारें गाढव, पाठीवरच्या वळांतून रक्त फुटलें तरी नांगर वा गाडी ओढणारा बैल, धन्याच्या लाथा खाऊनही पाय चाटणारा गुलाम वृत्तीचा कुत्रा हींच त्यांच्या मतें अधिक मोलाचीं ठरतील. पण स्वाभिमानी, स्वतंत्र बाण्याचें व त्रास देऊं लागतांच सापासारखें फुस्कारणारें व क्वचित ओरबणारें मांजर त्यांना कसें आवडावें ?

एक खरें कीं एखाद्या वस्तूची उपयुक्तता क्षमता म्हणजेच केवळ आनंद दातृत्वशक्ती नव्हे, आणि हें समजणारा कोणीही वाचक चपळ, खेळाडू, लवचिक व मृदु देही माऊसाठीं आपल्या सौख्यदात्याच्या गणनेंत पहिलें राखून ठेवील !

## तरु—तळीं

एका उंच टेकडीवर एक शाळा व त्या शाळेजवळ प्राचीन संस्कृतीप्रमाणें अढळ, भव्य, बहुशाखी असा तो आम्रवृक्ष आणि त्या आम्रवृक्षाखालीं जमलेलीं गाईवासरें हें चित्र अजून माझ्या डोळ्यापुढें कितीदां तरी येतें. कारण याच पुराण वृक्षांच्या भूचूंबित अशा एखाद्या डौलदार शाखेवर आरामांत बसून मी सूर्यास्ताच्या किरणधा-

रांचें सायंपान करीत असें व त्या नितांत सुंदर व एकांत स्थळीं राम बादशाहाच्या:—

हे वृक्ष वनांतिल सगे सोयरे माझे ।
कीं प्राण बहिश्चर वृक्षवृन्द हा साजे ।

या सुंदर गीतांचा मकरंद खात बसें. तुळसुली गांवचा तो आम्र-वृक्ष अजूनही माझ्या स्मृतिजीवनांत जेव्हां जेव्हां जिवंत होतो तेव्हां तेव्हां त्याच्या स्निग्ध सुवासानें मन भरून येऊन मी म्हणूं लागतों कीं ' अहं वृक्षस्य रेरिवा ' !

खरें म्हटलें तर आनंददानाचें अतुल सामर्थ्य असणाऱ्या वृक्षांची यथार्थ किंमत आपणांला समजलेलीच नाहीं. ती समजती तर वृक्ष राजी पाहून आपण म्हटलें असतें कीं ' सा एषा आनंदस्य जननी. ' पण असें आपण म्हणत नाहीं याचें कारण वृक्ष आनंदानें करतात तें इतक्या मुग्धपणें कीं रात्रंदिवस प्रेमळ मातापित्याप्रमाणें शीतोष्णाची पर्वा न करतां त्यांनीं केलेल्या सेवेची आपणांला जाणीवही होत नाहीं.

परंतु फलपुष्पभारानें नमलेले वृक्षच नव्हेत तर सकृद्दर्शनीं अनुप-युक्त वाटणारे वटवृक्षही सेवा व आनंद वर्धनाची दिक्षा घेऊनच राहिले आहेत. उगाच नाहीं योगी ऋषी अश्वत्थ, पिंपळ अगर वट-वृक्षाखालीं ध्यानधारणा करीत ?

परंतु वृक्षांची आनंददायी भाषा ऐकण्याची पात्रता आपल्या श्रोत्रें-द्रियांत उरलेली नसते. मानवी सौंदर्य ज्याचे पुढें लाजेनें फिक्कें पडेल असें वृक्षसौंदर्य पारखण्याचें सामर्थ्य आपल्या नजरेंत राहिलेलें नसतें व त्यांच्या स्नेहल स्पर्शानें पुलकित होण्याइतकी पवित्रता आपल्या स्पर्शेंद्रियांत नसते. म्हणूनच तरुतळ म्हणजे आनंदधाम हें

आपणांला पटत नाहीं पण वडापिंपळाला प्रदक्षिणा घालणाऱ्या, तुळसी वृन्दावनाचें पूजन करणाऱ्या आजच्या व अप्रसू अशोकावर मदिरेची चूळ टाकून कोमल पदस्पर्श करणाऱ्या कालच्या स्त्रियांना ही भाषा ऐकूं येई व येते, स्वरुप–सौंदर्य दिसे व दिसतें म्हणूनच त्यांचें सहज सौंदर्य टिकून राहिलें नसेल ना ?

परंतु आम्हीं पुरुषांनीं सर्व दिवस गुलामगिरी करावयाची, बाहेर रक्त आटवून घरीं घासलेटी दिव्यापुढें धूम्रपान करीत आयुष्य कंठावयाचें व विनामुल्य लाभणाऱ्या आनंदाला पारखें होऊन म्हणावयाचें कीं जगांत आनंद तरी आहे कुठें हो ?

## किल्ली

त्या रात्रीं मी खराच दमून भागून परतलों होतों. दिवस थंडीचे होते. ती थंडीही सिंधांतली होती. एकदां घरट्यांत जाऊन उबदार बिछान्यावर अंग टाकलें कीं सर्व श्रम परिहार होणार होते. आधींच उशीर झाला होता, पाय दुखत होते व डोळे पेंगत होते. म्हणूनच मी घाईघाईनें घरीं आलों व दार उघडायचें म्हणून खिशांत हात घातला तों काय ? किल्ली नाहीं.

सर्व सर्व शोधलें, आपादमस्तक देहसंशोधन केलें. चंद्रप्रकाश छान पडला होता. खोलींतला बिछाना स्वच्छ दिसत होता. विश्रांति आतूरतेनें वाट पहात होती. पण माझ्या व तिच्यामध्यें घट्ट गजांचें दार होतें व त्या दाराला घातलेलें शिंपली एवढें कुलूप मला या प्रलोभनीय सुखापासून दूर ठेवीत होतें. कुलुपाची प्रतिबंधक शक्ति केवढी दांडगी असते त्याची आज मला साक्ष पटली. शेवटीं सर्व

रस्ता शोधला. जिथें जिथें पडण्याचा संभव दिसला तें तें सर्व तपासलें पण ती मिळाली नाहीं; एवढया रात्रीं कुलुप फोडणेंही शक्य नव्हतें. काय करावें हेंच सुचेना.

शेवटीं माझ्या बौद्धिक जीवनांतच केवळ खेळलेला साम्यवाद जागा झाला. रस्त्याच्या कडेला अगर पादपथावर झोंपून रात्रीं कंठणाऱ्या हजारों भिकारी बांधवांची आठवण झाली. म्हटलें एक दिवस घ्यावा अशाही आयुष्याचा अनुभव ! पण चावरी थंडी सुटलेली, मधून मधून वस्तऱ्याच्या पात्याप्रमाणें कापणारा वारा, अशा या गारव्यांत मनांतला हा साम्यवाद थिजून बर्फ व्हायला कांहीं फार चालावें लागलें नाहीं. शेवटीं साम्यवादाचा अनुभव अर्धा कलाक घेऊन एका मित्राघरचा रस्ता पकडला. पण त्या किल्लीचा राग केला नव्हता. आधीं ती हरवावी कां, ती हरवली म्हणून कुलुपाची दांतखिळी बसावी कां, बरें कुलुप एक उघडेना म्हणून माझ्याच हक्काच्या खोलीनेंही पण मला आंत येण्याला कां मना करावी ?

आणि हे प्रश्न सोडवत असतांच दुसऱ्या एका गूढाची किल्ली सांपडली. आपण जग दुःखानें भरलेलें आहे असें म्हणत असतों. मग सुख तरी आहे कुठें ? आपलें खरें घर कांहीं जग नाहीं. स्वर्ग हें आपलें घर. जीवनभर श्रमून आपण आपल्या खऱ्या घरीं जीवनाच्या रात्रीं येतों. पण त्या वेळीं जर आपल्याकडे किल्ली नसली तर स्वर्गाचें दार उघडत नाहीं. परत जगांत वणवण फिरावें लागतें. हीच गोष्ट अंतर व बाह्य सौंदर्याविषयीं. खरें सौंदर्य, खरा आनंद बंदिस्थ असतो. तें सौंदर्य तो आनंद प्राप्त करून घेण्याला किल्लीची आवश्यकता असते. जगांतून अनेक वेळां आपणांला अंतःसौंदर्य, चिरशांति, चिदानंद दिसत असतात. पण एक किल्ली नसली कीं सर्व फुकट !

## सरडा

दांभिकपणा हा मनुष्याच्या पांचवीला पुजलेला असतो असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं; तसें नसतें तर ' खायचे दांत वेगळे व दाखवायचे वेगळे ' अशी म्हण पडलीच नसती. परंतु या म्हणींतही थोडी दुरुस्ती हवी असें मला वाटूं लागलें आहे. कांहीं मंडळीचे रीतरिवाज पाहून मलाही असें वाटूं लागलें आहे कीं या मंडळीचे हंसायचे दांत वेगळे व विचकायचे वेगळे असावेत. आणि मी म्हणतों ती दुरुस्ती हीच, आणि या दुरुस्तीला चांगल्या चांगल्या प्रस्थांच्या आचरणाचा आधार आहे.

किंबहुना दांभिक नसेल तो मनुष्यच नव्हे असा उलट सिद्धांत सुद्धां पडायला हरकत नाहीं. शिष्ट या शब्दाच्या कोशांतील अर्थाला मी अनभिज्ञ आहें. पण शिष्टांच्या पायऱ्याच करावयाच्या तर त्या त्यांच्या अंगच्या दांभिकपणाच्या अनुक्रमावरच कराव्या लागतील. अस्सल दांभिकच शिष्टांचा दादा होऊं शकेल.

या दृष्टीनें शिष्ट हे ढेकणासारखे आहेत. तुमच्याच आसनांत स्थान मिळवून ते तुमचें रक्त शोषण्याचा प्रयत्न करतील. पण तुम्हीं त्यांना चिमटींत पकडलें कीं तुकारामबोवांचा अवतार !

मात्र सरडा असा नाहीं. मनांतले विकार तो छपवूंच शकत नाहीं. विकार हे सगुण असतात कीं निर्गुण असतात हें ठरविणें शास्त्रज्ञांचें काम आहे. पण रूढीनें आपले प्रयोग भाषासांप्रदायांत दाखल केले आहेत. ते पाहतां विकार म्हणजे भाव नसून सवर्ण गुण असावेत असें वाटतें.

गोप्या भीतीनें पांढरा फटफटीत झाला, घाबरगुंडी उडून भाऊ-

साहेबांचें धोतर पिवळें जर्द झालें, सांवळ्याची चोरी उघडकीस येतां तो काळा ठिक्कर पडला, रावबहादूर रागानें लाल झाले. मधुकरराव दृष्टीस पडतांच मनुताईच्या गालांवर गुलाबी छटा झळकली इत्यादि सांप्रदायावरून विकारांच्या अंगीं मनुष्याचे चेहरेच काय पण वस्त्रेंही रंगविण्याचें सामर्थ्य असावेंसें वाटतें. परंतु या विकारानांही दाद न देतां वागणारे काय थोडे आहेत ?

रावसाहेबांकडून ' यू सिली फूल ' चा अहेर घेऊन ' रावसाहेब मला काय सुंदर फूल ' म्हणाले असें बाहेरच्या कारकुनांत सांगणारा बंदा गुलाम, एखाद्या कॉलेज पोरीकडून चपलांचा प्रसाद खाऊन 'वाः काय पोर मुरकली' म्हणून सांगणारा प्रेमवेडा, धोतर पिवळें झालें तरी मिशी पिळवटून बघतों कायतें म्हणणारा भ्याड भाई हीं पात्रें कांहीं व्यवहारांत विरळा नव्हेत.

पण सरडा मात्र इथून तिथून प्रामाणिक. त्याच्या हृदयाचे ठोके मोजून घ्यावेत ! विकार बदलेल तसा त्याचा रंगही बदलेल. दांभिकपणा हा त्याच्या गांवींही नाहीं. जसा आंत तसा बाहेर.

आणि म्हणूनच शिष्टांच्या समाजांत विकारांचें हें असलें बॅरोमिटर खपत नाहीं. कारण असल्या प्रवृत्तीच्या माणसांमुळेंच त्यांचे दाखवायाचे दांत तर पडतातच पण खायचे दांतही अनेक वेळां घशांत अडकतात.

मग असला सरडा कोणाला आवडेल ?

## घड्याळ

' टाइमोडेडबिटीस ' नांवाचा एक रोग सध्यां झपाटयानें पसरत असून क्लॉक्स, टाइमपीसीस, वॉचीस वगैरे लहान मोठे घड्याळाच्या जातीचे प्राणी त्यांच्या भराभर आहारीं जात असून लवकरच जग निर्वेळायंत्र होण्याचा संभव आहे, अशी एखाद्या 'फ्री प्रेस'ची तार जर उद्यां सर्व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली तर काय गंमत उडून जाईल ! कारकून, गिरणींतले मजूर, शाळेंतले विद्यार्थी आनंदाने गांवभर नाचतील व घडयाळशाहीच्या जुलुमांतून सुटल्याबद्दल एक स्वातंत्र्य-दिन पण साजरा करतील !

आणि या आनंदांत मीहि भाग घेईन कारणः—

गडबड घाई जगांत चाले
आळस ऊलक्या देतो पण
घडयाळ बोले परी तयाला
आला क्षण गेला क्षण !

हें कविवचन जिव्हाग्रावर नाचत असूनहि मला घड्याळाकडे पाहून वेगळेच विचार सुचतात. घड्याळ एक क्षणभर तरी स्तब्ध असतें काय ? मग आम्हींच ऑफिसांत टेबल खुर्चीशीं लगीन गांठ बांधून ७–८ तास कां बरें बसावें ? एका घड्याळाचें दुसऱ्याशीं कधीं तरी जमलें आहे का ? मग आम्हांलाच समता, सहविचार यांचा बोध कां करण्यांत यावा ?

तसें पाहिलें तर घड्याळ हें वेळ दाखविण्याचें यंत्रच नव्हे मुळीं ! घड्याळ हें वेळ छपवण्याचें यंत्र ! तुम्हीं वाटलें तर हें खोटें म्हणा

बापडे. पण याविषयीं माझ्याकडे भक्कम पुरावा आहे आणि तो पाहून कोणीही कबूल करील कीं घड्याळ म्हणजे वेळ छपविण्याचें यंत्र.

आमच्या गंपूनानांकडे चांगलीं पांच घड्याळें आहेत. एक आहे मनगटी घड्याळ. तें दिवसांतून दोन वेळां बंद पडतें. तुम्ही म्हणाल मग हवें कशाला तें घड्याळ ? पण वेळ दाखविण्यासाठीं नाहींच आहे तें ! गंपूनाना तें वापरतात केवळ शोभेसाठीं दागिना म्हणून. दुसरें घड्याळ त्यांच्या कोटाच्या डाव्या बाजूला आंतल्या खिशांत असतें. हें लाडकें घडयाळ सबंध दिवस त्यांच्या हृदयाशीं कसल्या कानगोष्टी करतें कुणाला ठावूक ! पण हें घडयाळ इतकें लाडकें होण्याला एक गुप्त कारण आहे. तें लावलेलें असतें रावसाहेबांच्या घडयाळाप्रमाणें. रा. सा. हे त्यांच्या कचेरीचे सरकारकून आणि त्यांचें घडयाळ तर असतें हपीसाच्या घडयाळामागें १५ मिनिटें. आणि म्हणूनच प्रसंगविशेषीं गंपूनानांना ह्या १५ मिनिटांची बचत करतां येते ! तिसरें घडयाळ आहे त्यांच्या हपीसचें. तें बेटें मोठें विलक्षण. सकाळच्या वेळीं ८-१० मि. मागें रहाण्याची व सायंकाळच्या वेळीं ५-१० मि. पुढें जाण्याची त्याची आहे संवय आणि हें सगळें केवळ कारकुनांच्या सोयीसाठीं ! पण या तीन घडयाळांवेगळीं गंपूनानांच्या घरीं आणखी दोन घडयाळें आहेत. त्यांतल्या भिंतीवरच्या घडयाळाचा सूर्य अर्धा तास उशिरां उगवतो आणि गंपूनानांच्या सौभाग्यवतीच्या तें चांगलेंच पथ्यावर पडतें. कारण नाना सकाळच्या जेवणाची घाई करूं लागले कीं वज्रचुडेमंडीत सौ. मामी मानेला एक वळसा देऊन म्हणतात "इश्श ग बाई, अजून चांगला अर्धा कलाक आहे ना दहाला ?" आणि अशा वेळीं जर नानांना विनोदाची थोडी

लहर आली तर चिंगी बनी सोन्या आणि शाळाजाऊ मंडळींना बाहेर हाकलण्याकरितां मेजावरच्या दहा मिनिटें पुढें ठेवलेल्या टाइमपीसकडे बोट दाखवून नाना त्यांना बाहेर काढतात ! अशा तऱ्हेनें एकट्या गंपूनानांच्या बाबतींत पांच घड्याळांच्या या पांच तऱ्हा आहेत.

ही स्थिती पाहून कोण म्हणणार नाहीं कीं घड्याळ हें वेळ दाखविणारें यंत्र नसून वेळ छपवण्याचें यंत्र आहे म्हणून !

## पडद्याआड

बोललेलें दडून ऐकूं नये, कुणाचें पत्र वाचूं नये हा नीतिशास्त्रांतलि एक दंडक असेल कदाचित्, पण चोरून पहाण्यांत, चोरून ऐकण्यांत एक अतर्क्य गंमत आहे यांत कांहीं शंका नाहीं. बाजारच्या विकत आणलेल्या आंब्यापेक्षां दुसऱ्याच्या झाडावरील हिकमतीनें पसार केलेल्या फर्नादाची गोडी जशी न्यारी तशीच चोरून ऐकलेल्या संभाषणाची व दडून पाहिलेल्या अनेक प्रसंगांची. खोटें कशाला सांगा ? ही तर प्रवृत्ति अगदीं साहजिक असते. भिंतींना सुद्धां कान फुटतात अशा वेळीं मग माणसाचें तर काय ?

लहानपणीं आम्हीं नाटकाला जात असूं. आमची जागा पुढेंच असे. रंगभूवर उघडाउघड चाललेल्या नाटकापेक्षां रंगभूमीच्या दों बाजूच्या पंखांआड चाललेल्या गमती पहाण्यांतच आमचें मन अधिक रमे. कण्वाच्या आश्रमांतून गाडिंवर येऊन उसासे टाकीत गेलेली शकुंतला पंखाआड जातांच विडी शिलगावून धुराचे लोट बाहेर टाकतांना पाहून पुढें राजा तिला दरबारांतून घालवून देतो तें करणें आम्हांला अगदीं योग्य वाटे. हो, विड्या ओढणारी बायको त्यानें कां

म्हणून पत्करावी ? आणि त्यावेळीं आम्हींही ठरवून टाकू कीं विड्या ओढणारी बायको मिळाली तर आपणही असेंच करावयाचें ?

तेव्हां सांगावयाचें काय कीं पडद्याआड पहाण्यांत एक गंमत आहे. बाहेर जें दिसत नाहीं तें पडद्याआड दिसतें. बाहेरचा साधु पडद्या आडचा सैतान असतो आणि बाहेरचा शिष्ट पडद्या आडचा मवाली ठरतो. थोरा मोठ्यांच्या कृत्यांवर एक पडदाच टाकलेला असतो. तें पाहायला रेनॉल्ड नको. हवें त्यानें आंत तोंड घालावें, गंमत पहावी, वाटलें तर एकमेकांना डोळा मारावा पण तोंडानें बोलूं मात्र नये. कारण ते मोठे असतात ! आणि समुद्रांत जशा गंगा यमुना तशींच गटारेंही वहातात. तसंच या कुटुंबांचें.

परंतु पडद्याआड उलट गोष्टीही पुष्कळ वेळां दिसतात. जग झालें तरी एक पडदाच असतो कीं नाहीं ? या पडद्याआडचें पहाण्याकरितांच नाहीं का आजवर हजारांच्या तपश्चर्या झाल्या व होत आहेत ? मोठमोठे शास्त्रज्ञ, संशोधक हा पडदा दूर करण्याकरतांच नाहीं का जीव वेचीत ? खरें पाहिलें तर मानवाची प्रवृत्तीच अशी कीं दिसेल तें सोडावें व दिसत नाहीं ते पहावें ! मनुष्याला नेहमीं वाटतें कीं या पडद्याआड कांहीं अलौकिक, कांहीं अपूर्ण कांहीं अद्‌भूत-थोडक्यांत सांगावयाचें तर अदृष्ट, अतर्क्य—असें कांहीं आहे. आणि तें पहाण्याकरतांच तर वाङ्मय, कला, शास्त्र तत्वज्ञान यांचा जन्म ! किंबहुना मानवनिर्मित प्रत्येक गोष्ट या प्रवृत्तीमुळेंच जन्मला आलेली 'पडद्याआड'चे देखणें ही त्याची आकांक्षा आणि या आकांक्षेपायीं तर संस्कृतीची प्रतिसृष्टी निर्माण झालेली !

पण समजा कीं उद्यां कुणीं शोध लावला कीं या पडद्याआड कांहीं नाहीं—केवळ शून्यत्व !—तर....तर....?

## केरसुणी

केव्हां केव्हां अशा विलक्षण गमती घडतात खऱ्या. म्हणजे होतें काय कीं आपण कोणतीही गोष्ट करावयाची एका हेतूनें व परिणाम व्हावयाचा अगदीं उलटच. त्या दिवशीं असेंच झालें. मी नवीनच जागा घेतली होती बिऱ्हाडाला. नवीन जागेंतला तो पहिलाच दिवस होता. तेव्हां उत्साहही भरपूर होता. सामानसुमान एका कोपऱ्यांत ठेवून दिलें. म्हटलें पहिलाच दिवस. चार मंडळी जागा पहायला यायची. नेहमी आपला आहेच आगगाडीचा डबा. आज तरी असावें घर आरशासारखें. म्हणून एक चांगली करकरीत केरसुणी आणली. कंबर बांधली आणि झाडायला सुरवात केली. पांच वेळ झाडलें सहा वेळ झाडलें पण घरची जमीन जणूं केंस कापणाऱ्याचें दुकान. जिकडे पहावें तिकडे त्या केरसुणीचीं पिसेंच पिसें पडलेलीं. कोणी म्हणावें नुकत्याच एकाद्या वडारणींनें इथें आपला केशविरचना समारंभ आटपून घेतला असावा व त्याचे अवगत भूमीगत झाले असावेत. पण तसें कांहीं नव्हतें; दोष होता त्या केरसुणीचाच. केर काढून टाकण्याऐवजीं वाढविण्याची कामगिरी ती बिनचूक करी. केरसुणीचा हात शेवटचा म्हणून कोपऱ्याकडे न्यावा तोंच मागें सर्व खोली दोन कोंबड्याच्या झुंजीनंतरच्या रणभूमीसारखी केरसुणीच्या पिसाटयानीं भरलेली दिसावी असें अनेक वेळां झालें. शेवटीं केरसुणी विकणाऱ्या दुकानदाराच्या चाळीस पिढयांचा उद्धार करीत ती दाराबाहेर फेकली व डुश्य करीत कोपऱ्यांतल्या सामानांत त्यांतल्या त्यांत आरामाची जागा करीत स्वस्थ बसलों.

पण इतक्यांत एक गंमत झाली. जागा पहाण्याच्या हेतूनें वामनकाका उपस्थित झाले. पण आजचा वामनकाकांचा थाट कांहीं वेगळा होता. दोन्हीं हातांना बँडेज बांधून व गळ्याभोंवतीच्या पट्ट्यांत हात अडकवून कुंथत कुंथत स्वारी आंत आली. मी म्हटलें, 'वामनकाका, अहो, आहे तरी काय हें ? आलांत तरी कुठच्या लढाईवरून ?

वामनकाका—'काय सांगणार बंडोपंत, परवांपासून जें कांहीं पोटांत दुखतें आहे कीं ज्याचें नांव तें.'

मी—'म्हणजे दुखणें पोटांत आणि हात पट्ट्यांत ?'

काका—'तसें नव्हे पंत. अहो, पोट भारीच दुखायला लागलें म्हणून गेलों पोट-स्पेशॉलिस्टाकडे. तो म्हणाला पंत, दुखणें कांहीं साधें नाहीं बरें ? अंपेडिसायटीस दिसतोय. जडलें तर जावें लागेल वरती. चार कच्चीं बच्चीं पदरांत. तेव्हां पैशांकडे कांहीं पाहूं नका. मी देतों तीं तीन इंजेक्शनें घ्या. तिघांत गुण नच आला तर सहा घ्यावीं लागतील एवढेंच. इंजेक्शनांना सुरवात झाली; सहाचीं दहा झालीं. पण पोटांतलें दुखणें कांहीं बरें झालें नाहीं न् हे हातमात्र सुजून मुद्गल झालेत !

मी—म्हणजे ? ही कोणती अवदसा गांठलीत तुम्हीं ? बरें, डॉक्टर तरी काय म्हणतो ?

काका—अहो, तो म्हणतो कीं एक वीष मारायला दुसरें वीष द्यायचें, एक दुख नाहींशी करायला दुसरें दुखणें उभें करायचें, हा तर वैद्यशास्त्राचा नियम आहे. उदाहरणार्थ पोटांतली दुख हाताच्या वाढत्या दुखण्यानें नाहींशी करायची व हात बरा व्हावा म्हणून मांडीवर इंजेक्शनें द्यायचीं असा आहे डाक्तराचा प्लान !

मी—ठीक. म्हणजे रोगी डॉक्टराच्या कचाटींतून सुटायला नको आणि मरेपर्यंत बराही व्हायला नको !

दोन दिवसांनीं मी ऐकिलें कीं वामनकाकांच्या पत्नीनें डॉक्टर-मजकुरांची बरीच हजेरी घेतली व स्वतःच ओवा व हिंग देऊन काकांची पोटदुखींतून मोकळीक केली.

जगाकडे पाहूं लागलें कीं वरील मासल्याचे प्रकारच अधिक दिसतात. परवांच आमच्या शाळेंत एका मुलाचे वडील आले व म्हणूं लागले कीं, ' काय करणार मास्तर, या पोराला मी उठल्या बसल्या उपदेशाच्या पाणमाऱ्यांत ओलाचिंब करून काढतों आहें पण दररोज पहावें तों नवीन नवीनच कमाई. कालच पहा, याला मी सिगारेट ओढतांना पाहिलें. काय, करावें तरी काय याला ? '

यावर थोडीशी पूर्वपीठिका समजावी म्हणून मी विचारलें, ' पण कायहो पालक, याला सिगारेट ओढूं नये म्हणून नव्हता का तुम्हीं उपदेश केला ?

उ०—कालच तर माझें त्यावर प्रवचन झालें. मी म्हटलें कीं बाळा, सिगारेट ओढतांना बरी वाटते, नाकाच्या धुरांड्यांतून धूर सोडतांना व त्याचीं वेटोळीं वेटोळीं हवेंत मिसळतांना प्रथम प्रथम फार मजा वाटते, पण मागाहून ती संवय जडली म्हणजे जात नाहीं. मग मात्र त्याचें दुःख होतें. म्हणून बाळा, सिगारेट कधीं ओढणें योग्य नाहीं आणि गंमत अशी कीं, ज्या दिवशीं मी या उपदेशाचा डोस त्याला पाजला त्या दिवशीं संध्याकाळीं याचे हातीं सिगारेट आपला धूर काढत हंसत हंसत खेळतो आहे. काय करावें याला ?

मी—कांहींच करूं नका व असला उपदेशही करूं नका कधीं. जर कुठें चुकलें असेल तिथेंच.

यावर मोठी गंभीर मुद्रा करून तो गृहस्थ जाता झाला.

जगांतलीं अनेक दुःखें सुद्धां आपल्या या आचरट फाजील चिंताजन्य वर्तनानेंच निर्माण होत असतात. या फाजील चिंतेची केरसुणी आपलें ' जीवन गृह ' निर्दुःख करण्याऐवजीं नसत्या दुःखाच्या कचऱ्यांनें भरून मात्र टाकते. एक दुख नाहींशी होण्याकरितां दुसरी दुख मात्र आपण मनाला लावून घेतों. मनांत न येणाऱ्या वाईट विचारांना फाजील महत्त्व दिल्यामुळें मात्र उघडें दार मिळतें आणि या सर्वांचें कारण आपल्या हातांतील केरसुणी !

## त्यांतलें इंगित

जगांतील ही एक गंमत आहे. कांहीं माणसें आलीं कीं वाटतें त्यानीं बसावें, बोलावें, खेळावें आणि जाऊंच नये. आपणही म्हणतों 'बसा हो जरा. काय इतकी घाई ? ' काळ कसा गेला हें कळत नाहीं. उन्हांत उसळून पसरणारा कारंजाचा पिसारा जसा रंगारंगाच्या छटांनीं वेड लावतो तसेंच त्यांचें संभाषण. प्रत्येक शब्द त्या जलतुषारासारखा जणूं रंगारंगानें भरलेला. आणि ते जेव्हां जातात तेव्हां वाटतें ' काय हो ही गंमत ! यांच्या संगतींतील काळ म्हणजे जणू या सुखदुःखमिश्रित जीवनवर्षावांतील इंद्र धनुष्यच ! सारखें पाहावें. मुसळधार कोसळणाऱ्या पावसाला विसरून जावें. पायाखालचा चिखल दृष्टीआड करावा. आणि या पावसाळ्यांत केवळ आनंद मानावा तो या इंद्रचापा करतां, या सदा प्रफुल्लित व्यक्तींच्या संगतीकरतां !

पण इतकी ही जादू त्यांना कुठें लाभते ? सदानंदत्व, सदाकर्षत्व हें यांना साधतें कसें ? का त्यांचें शरीर सोन्याचें व आमचें मातीचें

आहे ? मग त्यांची संगत आनंदाची, त्यांचें बोलणें म्हणजे अंतर खोलणें, त्यांचें हास्य म्हणजे पक्ष्यांचें किलकिलणें, त्यांचा सहवास म्हणजे स्वच्छ पाण्याचा झरा असें कां वाटावें ? अशी कोणती माया असते त्यांचेपाशीं ? यांतलें इंगित तरी कोणतें ?

आणि याचा विचार करूं लागलों कीं बडोद्यांतील ज्यूबिली बागेची मला आठवण होते. या बागेंतील गौतमबुद्धाच्या कमलासनस्थ पुतळ्याकडे मी तासनातास पहात राहीं; वाटें कीं आजूबाजूचें सर्व व्यर्थ, केवळ संताप ! पण या पुतळ्याच्या समीपची जागा केवळ शांत तपोवन. एक आनंदाचें वलय त्या स्थानीं पसरलेलें असावेंसे वाटे. चंद्र जसा काळोख्या ग्रह गोलांना कौमुदीनें सुप्रकाशित करतो तसा हा बुद्धदेव !

आणि त्याच प्रमाणें एका मंदिरांतील कृष्णमूर्तीची मला आठवण होते. मी बोलून चालून अमूर्त पूजक. कधीं देवळांत न जाणारा. पण वाटे कीं या मंदिरांत जावें, मूर्तीपुढें बसावें, मूर्तीशीं संलग्नमन व्हावें व सर्व कांहीं विसरावें !

हें असें कां व्हावें ? चित्रें कां कमी असतात कीं मूर्त्या थोड्या आहेत ? मग बुद्धदेव अगर भगवान कृष्ण यांच्या शिलास्मृतींत अशी कोणती मोहिनी असावी कीं आपण देहभान विसरावें ? आपण या अनेक दुःखग्रस्त संसारांत नसून सुखसागरांत पोहत आहों असें वाटावें ?

आणि यांतलें इंगित शोधूं जातां दिसतें कीं ते एकच—या महानुभाव विभूतींच्या मुद्रेवरील मंदस्मित ! वाटतें कीं जिवाची कुरवंडी करावी पण तें मंदस्मित साधावें, वाटेल तें मोल द्यावें पण तें मंदस्मित मिळवावें. पण मंदस्मित ही अशी क्रयविक्रयाची गोष्ट का आहे ?

आकाशांतील तारका सिमेंटच्या कारखान्यांत का तयार होतात ? कुंदाचें फूल जसें कागदाचें करतां यायचें नाहीं तसेंच मंदस्मित फुलें व मंदस्मित चांदण्या हीं जन्मावींच लागतात. गुलाबी रंग देऊन चेहरा गुलाबी करतां येईल एक वेळ, पण मोहक मंदस्मित हें अंतःकरणाच्या तडागांतूनच बाहेर पडावें लागतें आणि म्हणूनच तर त्याची थोरवी.

आणि हें सर्वचुंबक मंदस्मित तरी उघडें मन, निष्पाप अंतःकरण सौंदर्यपूर्ण भावना यांच्या जलराशींतूनच बाहेर येतें ना ?

आणि म्हणूनच कांहीं व्यक्तींची संगत हवीशी वाटते त्यांतलें इंगित हें कीं त्यांचें मन उघडें, अंतःकरण सरळ, मनोभाव सौंदर्य-मंडित असतात ! व या अशा शीलांतूनच मंदस्मिताच्या विशुद्ध विमल कमलाचा जन्म होतो !

## सुखाचे संसार

संसार हा शब्द ऐकला कीं मला वाटतें आगीवर पाय पडला. एक चटका न बसतां बसतो. हा शब्द कानीं येतांच मी पुटपुटतोंः—

कस्ते कांता कस्ते पुत्रः ?
संसारोऽयमतीव विचित्रः !

आणि असें होणें हें केवळ निवृत्त मनाचें लक्षण नाहीं. कारण जात्या मी प्रवृत्तिमार्गी. पण आजुबाजूच्या संसाराचें निरीक्षण केलें कीं मला वाटतें कीं हे का पुण्यवंतांचे संसार ? दुःखाच्या खाई या ! जलसा ऐकायला म्हणून जावयाचें आणि सारंगीची तार तुटलेली,

मृदंगाचें तोंड फाटलेलें, पंटीच्या पट्टयाच निघालेल्या पहायला मिळाव्या. त्यांतली ही या संसारांची गत !

पण खरें म्हटलें तर संसार हें संगीत आहे. कुटुंबांतील हरएक व्यक्तीचा आवाज एकमेळ होऊन आनंदगीत गायलें जात आहे, कुठेंही विसंवाद नाहीं, वाद्यें सुराला लागलेलीं आहेत व गोड आलाप प्रस्फुटित होत आहेत असें चित्र पहावयाला मिळावें. पण जगांत अशा पूर्ण संगीतमय संसाराचा अभावच दिसतो. असें का ?

असें होण्याचें एक कारण समाधानाचा अभाव. शेंकडा नव्वद लोकांचें जीवनच असें कीं बिचाऱ्यांना समाधानाचा अंशही लाभलेला नसतो. आणि तो लाभणार तरी कसा ? जगद्रुपी घड्याळाच्या या कारखान्यांत सारी यंत्रांची गल्लत झालेली. पण रूढींचे नियम मात्र असे कीं हातीं येईल तें बसवलेंच पाहिजे. निवडीची गोष्टच नको. मग संसाराचें हें यंत्र सुरळीत कसें चालावयाचें ? आणि संसार हा असा इतका कडवटपणानें भरलेला म्हणूनच तर जिथें जावें तिथें ऐकूं येतें कीं ‘ सुख पाहतां जंवापाडे, दुःख पर्वताएवढें !

परंतु या विपरीत परिस्थितींत सुद्धां क्वचित सुखाचा संसार दृष्टीस पडतो. निंबाचा पाला चघळून कडू तोंड झालेल्याला गुंजेचा पाला मिळावा म्हणजे जसें वाटतें तसें वाटतें. आणि अशा वेळीं आपण म्हणतों कीं धन्य ! जगावें तें हे असे सुखाचे संसार पहाण्यासाठींच.

आनंदाचें तत्त्वज्ञान सांगणारे विरळाच भेटतात, एखादा टागोर वा एखादा कृष्णमूर्तीच सांगू शकतो कीं जग ही आनंदाची लीला आहे. पण या तत्त्वज्ञानांहूनही तें तत्त्वज्ञान व्यवहारांत आणून सुखाचे संसार करणारे तर विरळाच भेटतात. पण कर्दमयुक्त तलावाला जसें कमळ

शोभा देतें, घोर अरण्याला कस्तुरीमृग सुगंधमय करून टाकतो, भीषण पर्वताला एखादा सरितोद्गम यात्रास्थान बनवतो तसाच एखादा सुखाचा संसार या दुःखपूर्ण विचित्र जगांत आशा, आनंद, समाधान यांच्या प्रदानानें सांगतो कीं इच्छाच असल्यास जग आनंदमयही करतां येतें. कमळाकडे दुर्लक्ष करून तलावांतला चिखल हाताळणाऱ्यांनें 'संसारोऽयमतीव विचित्रः !' असें म्हणावें यांत नवल काय ?

पण जग चालावयाचें व संसार म्हणजे आनंद विहार असें स्वरूप यावयाचें असलें तर आनंद प्रचारक तत्त्वज्ञानीही हवेत व त्यांचें तत्त्वज्ञान आचारांत आणणारे कर्मयोगीही हवेत. आणि यांची जोडी आहे म्हणूनच जगाचे व्यवहार चालले आहेत ना ?

एऱ्हवीं जग म्हणजे काय ?
वाटल्यास नरक—
मानल्यास स्वर्ग !

## पाऊस

" ये ये पाऊसा
तुला देईन पैसा "

असें गीत शतवार गाऊन मुलांनीं आमीष लावल्यामुळें त्या पैशाच्या लोभानें असो अगर इंद्राच्या दरबारांतून अरुणाला आपली जलगाडी घेऊन खालचा भूभाग जलसिंचित करण्याचा हुकूम मिळाल्यामुळें असो झिम झिम पाऊस येऊं लागला. आणि त्या वस्त्रगाळ पावसाला प्रारंभ होतांच प्रारंभीचें ऊन्ह पाऊस यांची जोडी पाहून—

ऊन्ह पाऊस गुंज
म्हातारीची मुन्ज !

असें म्हणून मुलें कुठच्या तरी एका वृद्धेच्या यज्ञोपवीत समारंभाची घोषणा करूं लागले.

बाहेरचा हा गलबला, झिमझिम पाऊस, आकाशांत आपले काळे पंख पसरून नाचत सुटलेले ढग हें दृश्य खिडकींतून दिसूं लागतांच माझ्या हातांतलें पुस्तक गळलें, पाय दाराकडे वळले व मी बाहेर पडलों ह्यांत नवल वाटण्याजोगें कांहींच नव्हतें. म्हातारीच्या मुंजीची आमंत्रणपत्रिका कांनीं येतांच प्राचीन काळीं स्त्रियासुद्धां वेद शिकत व त्यांची मुंजही होत असे, नाहीं का ? असा एक विचारही मनांत आला पण असल्या गहन, गंभीर व किचकट विषयाचा विचार करण्याचा का तो प्रसंग होता ? अलीकडे वाढलेल्या उन्हाळ्यांत एखाद्या भट्टींतून रोटी भाजून काढावी तसा नेहमीं भाजलों जात होतों मी ! कितीदां तरी

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया
झडकरि वरुणाला वर्षण्या सांग राया

म्हणून प्रार्थना करतां करतां दमून गेलों होतों मी तेव्हां पाऊस पडतांच अंगभर भिजायचें व नको होईतों फिरायचें अशा निश्चयानें मी बाहेर पडलों यांत काय नवल ?

पण बाहेर पडतांच धांपा टाकीत व जणू काय कुठें आगच लागली अशा भीतीनें पळत पळत आलेले गुंडोपंत दाराच्या फटींतून डोकें काढून म्हणाले, ‘ का स्वारी कुठें भिजत चालली आहे ? आणि छत्री नाहीं दिसत ? ’ मी म्हटलें ‘ अहो, भिजायलाच चाललोंच मी ! येतां का

पावसांत ? जरा गंमत तर पहा ' त्याबरोबर त्यांनीं असें कांहीं तोंड केलें व ' वाऽ ! ' करून असा कांहीं जबडा पसरला कीं मला वाटलें कीं काय मनुष्य हा ! आणि मी पुढें जातांच गुंडोपंतानीं आपल्या सौभाग्यवतीकडे पाहून ' विक्षिप्तच दिसतात राजेश्री ' हा काढलेला उद्गार माझ्या कानीं आला.

पण विक्षिप्त कोण ! पाऊस येतांच आनंदानें त्याची मौज लुटायला बाहेर पडलेला मी कीं पाऊस येतांच खिडक्या दारें बंद करून सारखे घरांत मुसंडी मारून बसलेले गुंडोपंत !

परंतु जग हें असेंच आहे. आनंदाच्या असंख्य प्रसंगांना दूर लोटून कर्मकहाणींचा कोळसा उगाळीत बसण्याची संवय त्याला झालेली आहे. त्याच्या सभ्यतेची व्याख्याच मुळीं अशी कीं बंधनें म्हणजे सुधारणा, निसर्गाला भिऊन भिऊन अंगीं आणलेली दुर्बलता म्हणजेच संस्कृती, सदा आंबट तोंडानें बसणें म्हणजेच चालरीत आणि मुक्त हास्य, सुलभ आनंद, अल्प वस्त्र शरीर, सहज प्राप्त सौंदर्याचा उपभोग म्हणजेच अशिष्टता ! आणि अनेक दुःखांचा प्रवेश या समतीच्या दिंडी दरवाजांतूनच होतो.

पण ज्याला यच्चयावत् प्रसंगांतून निसर्गाच्या विविध लीलातरंगांतून आनंद मिळवायचा आहे त्यानें सभ्यासभ्यतेचे धडे लहान मुलांकडूनच घेतले पाहिजेत आणि या बाल गुरूकडून सौख्य संदेश घेणाऱ्यांच्या लक्ष्यांत येईल कीं पहिल्या पावसांत, झिम झिम वर्षणाऱ्या जल तुषारांत एखाद्या वृक्षाप्रमाणें अंग भिजवणें असभ्यता नसून आनंद निमज्जन आहे. पण हें समजेल तेव्हां ना ?

## मत्सर

प्रकाश असला कीं मागें छायाही पडावयाचीच हें जसें ठरलेलें तसेंच गौरव आला कीं त्या मागून मत्सराची छायाही यावयाचीच. आणि हा अनुभव कांहीं माझ्या एकट्या मित्राचाच नाहीं. थोर लेखकही या मत्सराच्या पाठ चालींतून सुटलेले नाहींत. तसें नसतें तर भर्तृहरीसारख्या यशोधन कवीला:—

बोद्धारो मत्सर ग्रस्ताः। प्रभवः स्मय दूषिताः। अबोधोपहताश्चान्ये। जीर्णमङ्गे सुभाषितम्‌ !

असे उद्गार कां काढावे लागते ? अर्थात मत्सराची ही कहाणी एका नव्हे शेंकडों शतकांची आहे.

मनुष्याचा स्वभाव असा कीं त्याला समीपस्थांचा गौरव सहनच होत नाहीं. तो दूरच्यांचा गोडवा स्वतः गाईल पण जर कां कोणी त्याच्याच एखाद्या शेजाऱ्याची, मित्राची तारीफ त्याचे तोंडावर केली तर त्याच्या अंगचा जळफळाट होईल. तो म्हणेल, नेहमीं माझ्याबरोबर फिरणारा, हिंडणारा, खाणारा, उठणारा हा ! आणि त्याचा हे लोक कसला गौरव करतात आणि या विचारानें जळजळणारें त्याचें मन कोणत्या ठिकाणीं कशी आग लावील तें कांहीं सांगतां येणार नाहीं.

परवांच माझ्या एका मित्राची एक गोष्ट. एका सामान्य पत्रांत कुठें तरी प्रसिद्ध झाली होती. गोष्ट प्रसिद्ध होणें ही गोष्ट कांहीं महत्त्वाची नव्हे. कारण असल्या क्षुल्लक प्रसिद्धी पलीकडे गेलेला तो मित्र होता. परंतु ही साधी गोष्ट सुद्धां सहन न झालेला त्याच्या

संगतींतील एक स्नेही त्यांकडे आला व त्या दोघांत खालील संवाद झाला

' कायरे, तूं त्या फिलिप्स गिब्जच्या त्या ह्या गोष्टीचं परवां भाषांतर केलंस ना ? '

कोणतें ?

' तें परवांच्या जयवंतातली तुझी गोष्ट ' ग्रन्थजाल '

' नाहीं '

' मग रूपांतर वाटतं ?

' च्छे च्छे '

' मला वाटतें नुसती छायाच तर मग ?

' छायाही नव्हे !

' मग मला वाटतें नुसता दोघांचा विषयच एक असावा ! '

' मित्रा, मी ती गिब्जची कथाच वाचलेली नाहीं तर कसें सांगूं ? पण तूंच मूळकथेचें नांव व त्याचें भाषांतर, रूपांतर असावेत असे वाटणारे उतारे सांगना ? पाहूं कदाचित् मनःसाम्यहि असेल ! '

' मग मी ती गोष्ट वाचलेली नाहीं ! '

' मग मूळ गोष्ट न वाचतांच का या तुला शंका आल्या ?

' नाहीं, पण मी कोणालासें या विषयावरील फिलिप्स गिब्जची कथा उत्तम असल्याचें म्हणतांना ऐकलें आहे ! '

' आणि या कोळ्याच्या जाळ्याच्या तंतूच्या आधारावर भाषांतर, भाषांतर नसलें तर रुपांतर, रुपांतर नसलें तर छायारुप, छायारुपही नसलें तर विषय साम्य असा तर्कांचा पूल बांधून उसनवारीच्या किंवा वाङ्मय चौर्याच्या पर तीराला मला नेण्याचा तुझा विचार होता ना ?'

आणि माझ्या मित्राच्या या शाब्दिक फटकाऱ्यानंतर माझ्या उपस्नेह्याचा चेहरा कसा झाला असावा हें पहाण्याचें भाग्य माझ्या मित्राकडे त्या वेळीं छायालेख यंत्र नसल्यामुळेंच मला लाभलें नाहीं !

पण या गोष्टीचें इतकें आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. रवींद्रांची इंग्रजी 'गीतांजली' प्रसिद्ध होऊन तीवर नोबेल पारितोषिक प्राप्त झाल्यावर तें भाषांतर दीनबंधू अँड्रयूजचें असावें असे म्हणणारे टीकाकार काय थोडीं वर्षें होते ? शेक्सपीअर व बेकन हे तरी वाङ्मयचौर्याच्या आरोपांतून सुटले आहेत काय ? 'ईश्वर संशोधनांतील एका कृष्ण कन्येचे अनुभव' हें शॉ मजकुरांचें पुस्तक वामनराव जोशांच्या 'सुशिलेच्या देवा'पूर्वी अवतरलें असतें तर त्या तपस्वी तत्त्वज्ञान्यावरही काय चौर्याचा आरोप थोडयांनीं केला असता ? आणि खांडेकरांच्या सुगीच्या प्रस्तावनेंतील अक्षरशः भाषांतर केल्यासारखीं वाटणारीं काव्यमर्यादेसंबंधांचीं वाक्यें एका पक्षोत्तर प्रकाशित मासिकांतून उध्दत करून केसरीनें काय थोड्यांची खोड मोडली होती ?

पण हे चालावयाचेंच, प्रकाश आहे तेथें छाया व गौरव आहे तेथें मत्सर हा असावयाचाच ! तो नसेल तरच नवल. आजूबाजूला घोंघावणाऱ्या अनेक तथाकथित मित्रांत एका चहात्या बरोबर शतगुणिक प्रमाणांत निंदक असावयाचे हे जाणणाराच कांहीं चिरंजीव कृती करूं शकतो.

'रत्नांचा जव्हारी रत्नची पारखी ।
येर देखोंदेखों हातीं घेती !' ॥

ही तुकोबांची वाणीच सांगते कीं:—

रत्न पारखी एखादा—

गाजर पारख्यांचेंच माप उमाप !

## ही कोण ?

‘ A young man married Is a man that is marred ’
मंगल ज्यानें विवाह केला। तो नर दुःखाचा धनि झाला !—

असें म्हणणारा मित्र तो! नागीण दिसल्यास हातीं पकडून चाबकासारखी फडकारण्यास न कचरणारा धाडसी जवान तो; पण एकादी स्त्री रस्त्याच्या दुसऱ्या कांठावरून जातांना दिसली कीं मानही वर न करतां उन्दरासारखा निसटून जायचा ! मगरीचे दांत मोजतांना त्याला भीति वाटली नसती पण वेणींतल्या मोगरीच्या कळ्यांचीही त्याला दहशत वाटायची अशा माझ्या त्या स्त्री-जन-सहवासमीत मित्राच्या प्रथम प्रकाशनांत—

माझी स्फूर्ति देवता

**उषा देवी**

हीस

अ

र्प

ण

अशी अर्पण पत्रिका पहातांच विजेचा धक्का बसल्याप्रमाणें मी आश्चर्यमूढ होऊन गेलें हें सांगणें कशाला ?

शेरलॉक होम्सच्या ऐटींत सिगारेटचे वाफारे सोडीत मी विचार करूं लागलों कीं ही उषादेवी कोण ? नांवावरून वंग युवती असावी ! मग इतके दिवस ही होती कुठें ? माझ्या मित्राची स्फूर्ति देवता बनण्याइतकी योग्यता हिनें मिळवली कधीं ? स्त्रियांना भिणाऱ्या माझ्या मित्राला हिनें वश केलें कधीं ? आणि ‘आजवर या देवतेचें

दर्शन मला कसें झालें नाहीं ? माझ्या मित्राच्या बोलण्यांत या मोहिनी-संबंधीं एक शब्दही कसा नाहीं आला ? हें गूढ तरी आहे काय ? या सर्व प्रश्नाचा उलगडा करावयाचा तर माझ्या मित्राच्या हरएक हालचालीवर पाळत ठेवणें जरूर होतें. तसें मी केलेंही. पण ही स्फूर्तिदेवता बगिच्यांत, टेकडीवर, नदी कांठीं, कुठें कुठेंच त्याला भेटलेली दिसली नाहीं. यामुळें गूढाचा खोलपणा उलट वाढला. पण विशेष लक्ष्य ठेवतांच एक गोष्ट माझ्या पहाण्यांत आली कीं अगदीं सकाळीं ५ ला उठून माझा मित्र टेकडीवर जातो. जातांना शीळ घालीत कवितेचे चरण गुंगत गुंगत स्वारी मोठ्या आनंदांत टेकडीचा माथा गांठते व ७-७।। ला परतते. ही गोष्ट पहातांच माझी खात्रीच झाली कीं या युवयुवतींचा मधुर संवाद टेकडीच्या माथ्यावर होतो. उद्यां सकाळीं उठावयाचें टेंकडीवर जाऊन छपून बसावयाचें व दोघांनाही चकित करावयाचें असा माझा निश्चय झाला.

दिवस दुसरा. वेळ सकाळची. स्थळ टेकडीचा माथा. नायक एका शिलासनावर समाधी लागल्यासारखा बसला आहे. कोणी एक झाडामागें दडून त्यांची हालचाल टेहळत आहे. तास दीड तास गेला कोणही दुसरें आलें नाहीं. नाटकाचा नायक शिळेवरून उठला. जाण्याकरितां वळावयाचा इतक्यांत झाडामागच्या तरुणानें त्याच्या खांद्यावर हात ठेवला. नायक चपापला.

‘ मित्रा, ही उषादेवी कोण ? ’

‘ कोणती ? ’

‘ या तुझ्या पुस्तकाच्या अर्पण पत्रिकेंतील ? ’

‘ कां ? तिचें वर्णन तर पहिल्याच पानावर दिलें आहे. ’

‘ हो, आहे खरें.—

—माझ्या एकांगी जीवनांत गंगाप्रवाहाप्रमाणें अनंत ओघानीं वहाणारा सौंदर्याचा प्रवाह आणून सोडणाऱ्या उषादेवते, प्रातःकालच्या नव प्रस्फुटित समयीं तुझें मंगल वदन दृष्टीस पडलें कीं आनंद लहरीनीं मानस टवटवीत होतें. केतकीचें सोनेरी पान माथीं खोवून मृदू मुक्त केशाना वाऱ्यावर भिर भिर उडूं देतांना तुला पाहिली कीं मूर्तिमंत सौंदर्य देवतेचें दर्शन होतें. तुझ्या दर्शनानें सुप्तांना जागृती, जागृतांना गती लाभते. माझ्या काव्यवीणेच्या तारांवर अलग अंगुली फिरवून त्याच्या आलापानीं माझें जीवन नादपूर्ण करणाऱ्या संगीत देवते, तुझें ऋण मी कसें फेडूं ? माझ्या नवोदित कवितांची सुमनांजली अर्पिण्यांतच माझी कृतज्ञता अधिक नाहीं का प्रगट होणार ?—

'हेंच का तें वर्णन ?'

'हो.'

'पण ही उषादेवी कोण ? या वर्णनावरून शेरलॉक होम्सलाही तुझी जीवन-रमणी शोधून काढतां यायची नाहीं मग माझी काय कथा?'

मित्रा, कल्पना सृष्टींतील देवता शोधायला शास्त्रज्ञ काय कामाचा ? कवीच्या हृदयालाच ही उषादेवी कोण हें कळेल.'

आणि मी कवी नसल्यानें माझ्या मित्राची ही स्फूर्तीदेवता मला अजूनही दिसलेली नाहीं. आपणांपैकीं कोणाला दिसल्यास मला सांगाल काय ?

## हलाहल व अमृत

लक्ष्मी व अवदशा, आग व पाणी, मध व किराईत वगैरे द्वंद्वें जगांतील विरोधाचीं दोन टोकें धरून राहिलेलीं असतात. परंतु केव्हां केव्हां तीं आपआपलें स्थान सोडून दुसऱ्यांत इतकीं मिसळतात कीं

त्यांत बरें वाईट ठरवितांच येत नाहीं. उदाहरणार्थ हलाहल व अमृत हीं एकच होत—निदान कांहीं वेळां तरी तीं एक होतात. असें मी म्हटलें तर वाचक डोळे विस्फाडून म्हणतात कीं सांगतो तरी काय हा गृहस्थ? एक जीव घेणारा दुसरा त्याला जीवंत करणारा हे ज्यांचे गुण ते द्रव एकच होतील तरी कसे?

तशांत साप हा मानव जातीचा उपकारकर्ता आहे; तो अनेकदां त्याला मरणाच्या प्रवाहांतून मागें ओढतो, त्याच्या दंशांत अमृत स्रवतें असें जर मी म्हटलें तर वाचक म्हणतील कीं, ह्याला वेड तरी लागलें असावें खास अगर लेखनापूर्वीं भांग, गांजा अगर अशांतलीच कांहीं निशापाणी या सद्गृहस्थानें केली असावी!

परंतु खरोखरच अशी स्थिति आहे. केवळ अज्ञानानेंच आपण कांहीं कांहीं अमूल्य वस्तूंना शत्रूस्थानीं मानीत असतों. अज्ञानाच्या अंधःकारांत ज्या केवळ भुतपिशाच्यांच्या आकृती वाटतात त्याच ज्ञानसूर्याच्या प्रकाशांत फळाफुलांनीं डंवरलेले वृक्ष दिसूं लागतात. जिथें मृत्यु दिसे तिथें अमरपण दिसूं लागतें. काळें कुट्ट डांबर दिसे तिथें साखर, इंद्रधनुष्याचे रंग दिसूं लागतात. वस्तू तीच ज्ञानाच्या दृष्टीनें मात्र पहायला हवें.

ज्ञान ही जगद्रहस्याची किल्ली आहे. पायाखालची जमीन, वरचें आकाश तें कशाला? सापाचें वीष ही सुद्धां ज्ञान दृष्टीनें पाहूं लागलें कीं एकेक रहस्यें उघडूं लागतात.

ज्या विषानें हजारों माणसें मरतात, जें विष हजारों माणसांना मृत्युसदन दाखवितें तेंच वीष ज्ञानाच्या हातीं गवसतांच त्याच विषाच्या टोंचीनें तो क्षय, महारोग अगर असेच भयंकर रोग हटवूं शकतो आजचें रसायन शास्त्र सांगत आहे.

चूक असते ती आमचीच. अंधाराचा डोळ्यांवरचा पट्टा सोडायला आपण तयार नसतों. तो डोळ्यावर तसाच ठेवून आपण म्हणतों कीं जगांत प्रकाश आहे कुठें ? आनंद निरतिशय आनंद ही अशक्यप्राय गोष्ट. परंतु ज्ञानीच म्हणूं शकतो की जगांतील प्रत्येक वस्तू— सापाचें विष किंवा प्रत्यक्ष हलाहल सुद्धां अमृत आहे. याला आपण मृत्यूची छाया समजतों तो तत्त्वतः अमरत्वाचा प्रकाश आहे.

परंतु सामान्याला वीष हें वीष !

अमृत हा केवळ भास !

पण ज्ञान्याला ?

हलाहल व अमृत हीं एकच !

## माता व कांता

एखाद्याचें पत्र आलें तर आपणांस आश्चर्य वाटतें. परंतु कित्येकांच्या बाबतींत असें होतें कीं त्याचें पत्र न आलें तरच आश्चर्य वाटावें. माझा मित्र या दुसऱ्या वर्गांतला आहे. दर पंधरवड्याला पौर्णिमा व्हावयाची हा जसा सृष्टीचा क्रम तसें त्यांचें पंधरा दिवसांनीं न चुकतां पत्र यावयाचें हाहि क्रम अलिकडे कांहीं वर्षे ठरलेला आणि पत्र तरी कसलें तें ? चांगली पत्रावळच म्हणाना ? त्यांत १०–१५ पानें असावयाचीं व १०–१५ दिवसांत आमच्या या मित्रोत्तमाच्या मानस सागरांत जे जे विचार, विकार, तुफानें, लाटा यांची गर्दी जमावयाची त्यांचे यथार्थ चित्रण या पत्रावळींत दिसावयाचें. परंतु त्यांच्या या नियतकालिक पत्राचा वटवडा एकदां न झाल्यामुळें मी थोडासा विस्मयांत पडलों होतों. इतक्यांत जोडांक

काढावा तसें एक जाडजूड पुरवणीसह दोन हप्त्यांचें पत्र किंवा पत्र-पुटक माझे हातीं आला.

आजच्या पत्राचा विषय माता व कांता हा होता. माझा हा मित्र गेल्या पंधरवड्यांत खूब आजारी होता. आई आजोळीं व बायको माहेरीं गेल्यामुळें त्यानें वरचेवर उल्लेख केलेला पण दोन दिवसांत नकोसा झालेला एकांतवास त्याला लाभला होता. आणि रिकामपणा-मुळें त्याला त्या आजारांत विचारचक्र चालवायला व लेखन फाळ फिरवावयाला भरपूर वेळ होता म्हणूनच तो म्हणतो—

जगांत स्त्री म्हणजे एक शक्ति आहे. ( ही शक्ति घरें फोडतांना भांडणें लावतांना व पुरुषांना लुबाडतांना मला दिसते ही गोष्ट वेगळी ) ही शक्ति आम्हा सांसारिकांना दोन स्वरूपांत दृष्टीस पडते. एक माता व दुसरी कांता ! ( म्हणजे सास्वासुना जावा भावजया बहिणीं विहिणी वगैरे या स्त्रीरूपी कालि-केचीं स्वरूपें कांहींच नव्हत वाटतें ? मित्रा तू किती धन्य आहेस ! ) परंतु माझ्या मंदिरांत ( पक्षी मुंबईच्या चाळींतील एका खोलींत ) आज या देवतेचीं दोन्हीं रूपें नाहींत परंतु सर्व जग त्यामुळें आज मला शून्य भासत आहे. आमची आई आजोळीं व ती माहेरी गेलीं आणि अवघ्या दोनच दिवसांत त्याची जागा खाणावळींतली अन्नपूर्णा व डॉक्टरची बाटली यांनीं घेतली. परंतु मित्रा, आईच्या हातच्या सुग्रास भोजनाची सर खाणावळींतल्या डब्याला कशीरे येणार ? आणि कांतेच्या ओठांवरील चुंबनमधु चाखणाऱ्या भ्रमराला डॉक्टरनें कितीहि साखरपाक घातला तरी तें कसें बरें गोड लागणार ? च् च् ! माझी स्थिती आज किती केविलवाणी झाली आहे म्हणून सांगूं ? बस्स. जगांत जर पुरुषाला कशामुळें सुख असेल तर तें केवळ माता

व कांता यामुळेंच ! संसाराचें तेज मातेंत, संसाराचा सौख्य झरा कांतेंत ! ( पुष्कळ वेळां या आगीच्या व पाण्याच्या संसर्गानें संसाराची आगगाडी सुरळीत चालण्याऐवजीं त्याची वाफच होते ही गोष्ट अर्थात् वेगळी. )

परंतु या दोघांची मदत मनुष्याला दोन तऱ्हांनीं होते.

मी आजारांत कोणाच्या नांवानें कंठ शोष चालवला होता असें तुला वाटतें ? ( डॉक्टरच्या ) कांतेच्या ? नाहीं नाहीं; आईच्या. कारण आजारांत शुश्रूषा करावी, काळजी घ्यावी तर आईनेंच.

परंतु आमच्या चाळींतून समोरच्या कृष्ण सिनेमांतील अमृतमंथनाची जाहिरात पहातांना कोणाची आठवण होत असेल असें तुला वाटतें ? फुकट सिनेमा दाखविणाऱ्या मित्राची ? आईची ? नाहीं नाहीं. राणीसाहेबांची. चित्रपट पहावा तर स्नात केश, गल्ल चूर्णांकित सूक्ष्म वस्त्रावरित, मंद हसित, स्निग्ध नयन कांतेच्या सुवास दरवळित सहवासांतच ! बस्स, जेव्हां आपणांला घेणें असेल तेव्हां माता !

देणें असेल तेव्हां कांता !

दुःखाच्या वेळीं जननी.

सुखाच्या वेळीं रमणी.

आजारांत आईसाहेब.

मौजेच्या वेळीं बाईसाहेब.

तूं कांहीं म्हण मित्रा, पण खरी गोष्ट आहे खरी अशी. आणि मनुष्याला संसारांत सुखाची अपेक्षा असेल तर माता व कांता यांची आवश्यकता आहे असें जें मी म्हणतों त्याचें कारण हेंच ! * "—

मला वाटतें मित्राच्या पत्रावर टीका करणें शिष्टाचारास धरून होणार नाहीं म्हणून तो प्रयत्न येथेंच सोडावा.

---

* पत्रांतील कंसांकित उद्गार अस्मादिकांचे आहेत.

# माध्यान्हीचा सूर्य

एक जुनें सुभाषित आहे. भर्तृहरीच्या काळीं तें जितकें सत्य होतें तितकेंच आजही आहे. अशीं सुभाषितें आपण थोडीथोडकीं का वाचतों ? पण अनुभवाविणें मात्र त्यांतलें पूर्ण सत्य आकलन होत नाहीं. आणि हा अनुभव कडवट असला तरी सत्याच्या प्रचीतींतील आनंद मनाला लागतो हें निःसंशय !

सकाळ झाली आहे. झुळझुळ झुळझुळ नदी वहात आहे. बालसूर्याची आरक्त छबी उदयाचलावर आली आहे. बालकाच्या निस्वार्थ, असमंजस वृत्तीनें तो सुवर्ण चूर्ण उधळत आहे. खालच्या नदीच्या पाण्यांत ते किरण चूर्ण मिसळून वाटत आहे कीं जणूं कांचन गंगेचा ओघच वहात असावा ! अशा या रम्य व उदात्त प्रसंगीं मन किती भाविक होतें ! त्या बालसूर्याला आपण किती भक्तीनें अर्घ्य देतो ? वाटतें कीं आपल्या तमोमय जीवनांत प्रकाशाचें सौंदर्य ओतून त्याला रमणीय स्वरूप देणाऱ्या या बालसूर्याला शतशः धन्यवाद असोत.

पण नंतर आपण कचेरींत जातों. कांहीं तरी बाहेरचें काम आपलेकडे आलेलें असतें. सकाळच्या कोमल हृदयी सूर्याचें स्वरूप पार बदललेलें असतें. भर माध्यान्हीच्या वैभव पदावर आरूढ झालेला सूर्य आपल्या प्रखर कटाक्षानें जगाकडे पहात असतो. श्रमित देहानें हुश्श करून निथळता घाम पुसणाऱ्या मजुरांकडे तो उपहासाच्या दृष्टीनें पहात असतो. अशा वेळीं सकाळच्याच आदरयुक्त भक्तियुक्त नजरेनें त्याकडे पहाण्याची छाती असते का आपणाला ? तसें आपण केलें तर आपला आदर, आपली भक्ती याची फेड तो आपले डोळे प्रखर

किरणांनीं दिपवून टाकण्यानेंच करतो ना ? बालसूर्याच्या दर्शनानें दृष्टी वाढते असें नेत्रशास्त्रज्ञ म्हणतात. उलट माध्यान्हींच्या सूर्याच्या दर्शनानें अंधत्व मात्र येतें. अशा वेळीं छत्री घेऊन आपण आपलें संरक्षण करतों व माध्यान्हीच्या गर्विष्ठ, अहंमन्य उपहासक सूर्याची पूजा करण्याचा मार्ग याहून कोणता असणार ?

वरचाच अनुभव आपणाला व्यवहारांत अनेक वेळ येतो. या दुःखद अनुभवानें मन कांहीं वेळ चलित—स्वास्थ्यही होतें, पण मला वाटतें हा अनुभव मनुष्यानें घ्यावाच, असले कडवट घोट घेतल्याशिवाय मनुष्यस्वभावाची ज्ञानदृष्टी पूर्ण व्हावयाची नाहीं.

आणि असे विचार मनांत येण्याला कारणही तसेंच झालें. एका प्रथित यश कीर्तिपदारूढ लेखकाला भेटण्याचा योग नुकताच मला आला. ज्याच्या प्रारंभकालीं प्रस्तुत व्यक्ती मला सहानुभूतिपूर्ण उत्तेजनद वाटली तीच व्यक्ती कीर्तीपदीं पोचल्यावर तशीच राहिली असेल अशी खोटी कल्पना मनीं बाळगून मी होतों. पण त्याच्या बोलण्यांतील उपहास, मत्सरयुक्त टीका, क्षुद्रत्वच व्यक्त करणारी प्रखर बुद्धिमत्ता हीं पाहून मात्र मला वाटलें कीं बालसूर्याचें सौंदर्य माध्यान्हीच्या सूर्याला नाहीं. व्यक्तित्व व कार्य यांत महदंतर आहे. तळपत्या कार्यांत आपलीं भातें पाहिजे तर वाळवून घ्यावीं. पण कृतज्ञता प्रगट करूं जाणे म्हणजे त्या वैभवशाली सूर्याकडून अंधत्वाचा प्रसाद घेणें होय. झाड वाढलें तर फळें देईल, आग वाढली तर वणवा लावील.

आणि म्हणूनच एक धडा मी शिकलों. ज्यांच्या विषयीं आपणांला आदर वाटतो त्या व्यक्तींच्या वैभवमाध्यान्हीं त्याला भेटण्याची इच्छा धरूं नये. सायंतनाची वाट पहावी. त्याच्या दृष्टींतून शक्य तर छत्री

घेऊन आपणांला टाळावं, असें करावयाचें नसेल तर ज्या प्रखर सत्यानें डोळे दिपतात, व भक्ति आदर वगैरे भाव सौंदर्य होरपळून जातें तें सत्य पहाण्याची तयारी ठेवावी.

काजव्यानें स्वतःच्याच शांत मंद तेजानें चमकावें. ज्योतीकडून प्रकाशवर्धनाची अपेक्षा करूं नये. ताऱ्यानें आपल्या तेजांतच आनंद मानावा. सूर्याच्या निकट जाण्याचा प्रयत्न करूं नये; हेंच खरें.

## बिंदूतून सिंधु

कमल पत्रावरचा बच्चा बिंदु किरणांमध्यें हासत होता. वाऱ्याबरोबर नाचत होता. सरोवर त्याला म्हणालें, 'अरे छोट्र, एवढें मी प्रथित यश, स्थित कीर्त, भव्य गंभीर सरोवर आणि तूं एवढासा वाटाण्याएवढा चिमुरडा आणि तुला माझ्यासमक्ष नाचायला लाज नाहींरे वाटत ? बिंदूनें डोकें हलवलें. कमल पत्राभोंवती एक सायकलची चक्कर घेतली व म्हटलें, सरोवर दादा, मी तुला एवढासा चिमुरडा दिसतो ना ! आतां तूं मला काढ पाहूं शोधून' असें म्हणून त्यानें सरोवरांत उडी टाकली आणि त्या भव्य खोल प्रथित यश सरोवराला तो चिमुकला बिंदु कुठेंच दिसत नाहींसा झाला. जिकडे पहावें तिकडे भव्य, विस्तृत सरोवर !

ही कथा साधी असली तरी आशयानें मोठी आहे. पुष्कळशा थोर व्यक्तींना थोरपणा बरोबर लहानपणाची विस्मृति घडते. बिंदुबिंदुंचा सिंधु व कणान् कणाची पृथ्वी होते. हें साधें तत्त्व त्यांच्या नजरेआड होतें. आपणही एक वेळ लहान होतों ही गोष्टच ते मुळीं

विसरतात. देवालयाच्या कळसानें पायांतल्या दगडाकडे उपहासानें पहावें व आपल्या उच्च पदवीनें त्यांचा धिक्कार करावा तशीच त्यांची गोष्ट असते. पण अत्युच्चीं पदीं विराजमान झालेल्या सुवर्ण कळसाचें अधिष्टान शेंकडों लाखों मातीच्या कणावरच अवलंबून असतें हें विसरून कसें चालेल ? देवालयचा कळस घडणीनें कितीही सुंदर असो तो अधांतरीं लोंबता राहूं शकत नाहीं.

हीच गोष्ट कोणत्याही उच्च पदारूढ व्यक्तीनें जाणावयास हवी. आपलें अत्युच्चपद अनेक सामान्य पण परोत्कर्ष पोषक व्यक्तींच्या मतावरच अवलंबून असतें हें त्यानें विसरूं नये. किंबहुना सामान्य व्यक्तींच्या प्रशंसेचा आधार नसेल तर त्याची कीर्ति व पद हीं स्थीर रहावयाचीं नाहींत. परंतु दुर्दैवानें आकाशचुंबी कळस आपल्या आधारभूत उपकारकर्त्या व आश्रयदात्या शिलांना विसरतो व प्रसन्न हृदयानें कृतज्ञता व्यक्त करण्याऐवजीं अंहकारानें तळपूं जातो. पण या अंहकारांतच त्यांच्या थोरपणाचा ऱ्हास असतो. तळपत्या उन्हापेक्षां शीतळ चंद्रिकेंतच कुणी झालें तरी विहार करण्याची इच्छा धरतो.

बरें, ज्या सरोवरानें तुच्छतेनें चिमुकल्या बिंदूला आव्हान द्यावें तो जलबिंदूतरी प्रकृतीनें हीन असतो काय ? परिस्थितीच्या कमलपत्रावर पडल्यामुळें आकाराचें लघुत्वच काय तें त्याच्या नशिबीं असतें पण हें लघुत्व त्याच्या सौंदर्याला पोषकच होतें. विशुद्धत्व, विमलत्व, चारुता, प्रसन्नता, सुरूपता या गुणांमुळें भव्य जलाशयापेक्षां कमलपत्रावरचा बिंदूच अधिक मनोहर दिसतो. माध्यान्हीच्या तृष्णेचें शमन करण्याचें सामर्थ्य त्याचे अंगीं नसेल. भव्य स्वरूपानें विस्मित करून उदात्तता निर्माण करणें त्याला साधत नसेल पण म्हणून त्याची मनोरमता थोडीच कमी होते ?

जन्म अगर जात यांत सरोवरांत व त्यांत साम्यत्वच असतें. सरोवराचे सर्व गुण धर्मबीजरुपानें त्याचे अंगी असतात. नसतात केवळ विपुलता, भव्यता !

परंतु हेंहि स्वरूप त्याला असाध्य नसतें. आपल्या परिस्थितीच्या क्षेत्रांतून उडी टाकून अथांग जलांत अवगाहन करण्याची तयारीच त्यानें दाखवावयाची असते. तसें केलें कीं तोच बिंदु सिंधु होतो व लहानथोरपणाचीं सर्व बंधनें नाहींशीं होतात व आपण म्हणतों बिंदूचें सिंधु जहालें !

## न कळणारीं दुःखें

हॉल केनचें 'प्रॉडिगल सन' जेव्हां जेव्हां मी हातीं घेतों तेव्हां तेव्हां प्रथम वाचावेसें वाटतें त्यांतलें ॲस्करची आई ॲना हिनें मुलाला लिहिलेलें पत्र. हें पत्र अनेक वेळ वाचलेलें असूनहि डोळ्यांत अश्रु आल्याविना रहात नाहीं. माझ्या एका मित्राची तर ही कादंबरी वाचतांना अशी स्थिती होत असे कीं तींतील करुणप्रसंग वाचतांना त्याचे ऊर दाटून येई, डोळे अश्रुनीं डबडबत व शेवट असा होई कीं पुढें वाचवत नसे. शेवटीं अनेकवार प्रयोजूनहि हें पुस्तक त्याला वाचवेना. जगांतील बरींनाईट सुखदुःखें भोगून कठीण हृदय झालेल्या मला देखील पुष्कळ वेळां असाच अनुभव येतो, असें कां व्हावें ?

विचार करा. परीक्षा उत्तीर्ण होतांच एखादा मुलगा मुंबई कराचीच्या मोहानें नोकरी शोधण्यासाठीं या मुंग्यांच्या वारुळांत शिरला. ओळख नाहीं, देख नाहीं, वशिला नाहीं व सर्वत्र पाट्यांवर ' जागा रिकामी नाहीं ! " असा मजकूर. अशा वेळीं मोठ्या आशेनें आलेल्या या

गरीब मुलाची काय स्थिति होईल ? घरच्या एकट्या आईला का तो हीं दु:खें सांगणार ? शक्य तर सर्व दु:खें, मानखंडणा, उपासमार, वस्त्र, दारिद्र्य ही लपवून ऑस्करप्रमाणें तो असेंच लिहील नाहीं का, कीं—

" आई ग, ही मुंबई काय गजबजलेली. नी इमारती तरी केव्हढया ग मोठ्या ताडामाडा एवढया. वर जायला विजेचे पाळणे, रस्त्यांत कांहीं मैलच्या मैल चालायला नको. ट्राममध्यें बसावें अन् वाटेल तिथें उतरावें, रस्ते तरी किती झकपक आणि चहाचीं दुकानें ?— ही अश्शीं !

इथें वेळच कसा तो पुरत नाहीं. थोरामोठ्यांच्या भेटी घेण्यांत वेळ कसा झपकन जातो. मात्र एवढयावरून तुला मी विसरलों असें नको बरें समजूं. तुझी श्रीमंती मुंबईहूनहि मोठी. तुझी मला आठवण येतेच. पण लिहित नाहीं याचें कारण वेळच नसतो हं. "

आणि मुलांचें असलें पत्र गेल्यानंतर बिचाऱ्या खेडवळ बाईनें काय समजावें ? ती असेंच समजेल नाहीं का कीं, आपला मुलगा केवढया सौख्यांत जाऊन पडला आहे ! आणि मग ती कदाचित् लिहवील—

" बाळा रे, मुंबई केव्हढीही मोठी असली तरी आपल्या गांवाला नको बरं विसरूं. तूं माडा एवढया उंच इमल्यांत रहात असशील पण आपली झोपडीची याद मात्र जाऊं देऊं नको बरं. तिथें मोठमोठे लोक तुला भेटत असतील. पण आपल्या गांवकरांचा मान ठेवण्याची आठवण जपून ठेव हं. आणि हें बघ बाळ, तिथें तुला सुके बांगडे कुठून बरं मिळणार ? नेहमीं गोड गोड जेवून व खाणावळींतली तुपरोटी खाऊन केव्हां केव्हां कंटाळा येईलच. तेव्हां तुझ्यासाठीं

कांहीं सुकी मासळी मसाल्यांत घालून गोविंदा गांवकराबरोबर पाठवली आहे. दादरावर जाऊन ती घेऊन ये. इतर मोठमोठ्या मंडळींना दाखवूं नकोस. ते हंसतील. फडताळांत ठेवून कोणी नसला कीं–"

आणि ज्या वेळीं वणवण हिंडून उन्हा तान्हांतून मुलगा कोणा ओळखी देखीच्या घरीं वा त्याच्या व्हरांडयांत परतत असेल, चहाला वा ट्रामला खिशांत एक पैसाहि नसेल अशा वेळीं त्या मुंबईचें अजस्र स्वरूप व वैभव यांचें दृष्टिसौख्य का त्याला सुखविल ? पत्राला पैसे नसल्यानें तो पत्र लिहिणार नाहीं व पत्रांत तरी काय लिहावयाचें– आपलीं दुःखेंच ना ? अशा वेळीं ती माउली मात्र तळमळत असेल कीं मुलगा मुंबईला भुलला. आपणांला विसरला. न कळणारीं दुःखें मी म्हणतों तीं हीं.

आणि ऑस्कर व ॲना यांचीं पत्रें वाचतांना एकाचें सोंग व दुसऱ्याची तळमळ पाहून आपणाला रडूं येतें या मुळेंच.

पण जगांत असले अनुभव अनेक वेळ येतात.

आणि अनेक वेळ हीं दुसऱ्याला न कळणारीं मुकीं दुःखें सहनहि करावीं लागतात.

खेद होतो तो या दुःखाचा तर खराच. पण या दुःखांहूनहि दुसऱ्यांच्या चुकीच्या समजुतींच्या व त्यांनीं करून घेतलेल्या ग्रहांचा.

माझ्या एका मित्राच्या बाबतींत असाच एक विचित्र अनुभव आला आहे. त्याच्या एका नातलगानें त्याचें नांव वर्तमानपत्रांत बरेच वेळ पाहिलें. तशांत त्याच्याच नांवाच्या दुसऱ्या एका गृहस्थाची सावकारी जोरांत चालून त्यांचा स्वतःचा बंगला बांधण्याचा विचारहि होता. बातमी देणाऱ्यानें त्याची थोडीशी प्रसिद्धी व त्यांची श्रीमंती यांचें

मिश्रण करून त्याचे एकदोन थेंब या दूरच्या नातलगाच्या कानीं ओतले. आणि दुसऱ्याच डाकेला त्याची आजवरच्या पत्र—न्यूनते-बद्दल खरड, मिळविलेल्या श्रीसरस्वतीबद्दल अभिनंदन व सोबत इमारत बांधावयाची तिचे दर्शनी द्वार कसें असावें, स्नान व स्वयंपाक घराची व्यवस्था कशी असावी, शौचकूप घरापासून किती दूर व कोणत्या पद्धतीचा असावा याचें सटीक व सचित्र सूचनापत्र त्याचे हातीं आलें.

मनोराज्यांतहि या गोष्टी त्याला शक्य नव्हत्या त्या चटसाऱ्या त्यानें कागदावर उमटवून तो खलिता रवाना केला. पण अलिकडचा शाळामास्तर म्हणजे वशिष्ट द्रोणाचार्य नव्हे. बिचाऱ्याच्या डोक्यावर नोकरी सुटण्याची कट्यार जिथें लोंबकळत असावयाची व शाळा चालकांनीं विचार केलाच तर कपात करावयाची ती गळा कापावा कीं हात कापावे कीं नुसतीं बोटें तोडण्याचें औदार्यच सध्यां पुरे, असाच जिथें विचार चालावयाचा व बढती ऐवजीं कात्रीच ज्याच्या डोळ्यांपुढें सदा असावयाची अशा धंद्यांतल्या त्या माझ्या मित्र असणाऱ्या शाळा शिक्षकावर संपत्तीची ही पाखरण व्हावी कशी ?

प्रसिद्धी व संपत्ती यांचें समप्रमाण गृहित धरणाऱ्यांना काय सांगावें ? म्हणून मी म्हणतों कीं न कळणारीं दुःखें तीं हीं !

## अतृप्त प्रेमाकांक्षा !

आम्हीं कॉलेजांत असतां एका विद्यार्थ्याचा आंबटशोकपणा पाहून आमची बरीच करमणूक होई. हा विद्यार्थी एखादें गुलाबी पाकीट नेहमीं खिशांत बाळगी व चार मित्रांत बसला कीं एखादा कागद

अगर वस्तु काढण्याच्या मिषानें तें पत्र मुद्दाम—परंतु सहज बाहेर पडल्याचा आविर्भाव करून-—बाहेर काढी व चेहरा भांबावल्यासारखा करून झटकन् खिशांत टाकी. चिकित्सक, अंतर्भेद पर्युत्सुक अशा स्नेह्यांना मग बोलण्याला आणखी विषय कोणता हवा? ते बळेंच तें पत्र त्याच्याजवळून काढीत. तोहि बुद्ध्याच अनेक कारणें सांगून टाळाटाळ करी. शेवटीं मित्र सक्तीचा आग्रह करीत. त्याचा नाइलाज होई, तो लाजल्यासारखें करी व तें पत्र एखादें प्रणयपत्र निघे! पत्राच्या शेवटीं एखादी नलिनी, कमलिनी, शालिनी अशांतली एखादी 'नी' असावयाचीच!

खरें सांगण्याची चोरी कशाला? आम्हांला त्याचा हेवा वाटे. वाटत असे कीं काय धन्य हा गडी कीं ज्याला अशीं वारंवार प्रणय-पत्रें येतात व अनेक पोरी त्याच्यावर अनुरक्त असतात; असें आहे तरी काय या प्राण्यांत?

शेवटीं एक दिवस मी सहज त्याच्या खोलींत गेलों. अचानक आल्यानें त्याला कळलेंहि नाहीं. पहातों तो स्वारी गुलाबी कागदावर कांहींसें लिहीत आहे. मेजावरून कागद ओढून पाहिला—श्रीयुतांनीं स्वतःच स्वतःला लिहिलेलें प्रणयपत्र होतें तें! बुडबुडा एकदम फुटला. पुढें त्याचा हा आंबट शोक वर्षभर आम्हीं लोणच्यासारखा पुरवून पुरवून खाल्ला!

पण त्यालाच कांहीं हंसावयास नको. मनुष्याच्या तरूणपणीं आपण कोणावर तरी प्रेम करावें व कोणाचें तरी आपल्यावर प्रेम असावें अशी चोरटी कां होईना इच्छा असतेच. तें कशाला? ज्यांनीं असल्या परस्पर प्रेमाचा अनुभव कधीं घेतलाच नाहीं अशा बुद्रुकांना सुद्धां

एखाद्या तरुण तरुणींच्या प्रेमकथा ऐकून रुखरुख लागत असते. तिरस्कार व टीका यांचा जन्म पुष्कळ वेळां या रुखरुखींत असण्याचा संभव असतो. पण काय असेल तें असो. हें प्रेमाकर्षण व त्याची अतृप्तता आयुष्यांत अनेक वेळ अनेक तऱ्हेनें डोकें वर काढतें.

तसें नसतें तर इटर्नल सिटींतील डेव्हिड व रोसी, शकुंतलेचें आंबुजपत्रलेखन, रुक्मिणीनें श्रीकृष्णाला पाठविलेली प्रणयपत्रिका मस्तानीचा विरहजन्य अंत या अगर अशाच विदग्ध वाङ्मयांतील कथाप्रसंगांत आपण इतके रंगून गेलों नसतों. आपण रंगून जातों त्याचें कारण आपल्या सुप्त भावनांच्या तंतूंवर आंदोलनें सुरू होतात. त्यांतून प्रेम संगीताच्या लकेरी ऐकूं येऊं लागतात व क्षणभर आपण वास्तव जगांतील रुक्षतेंतून निघून त्या अतृप्त वासनांच्या स्वर्गभूमींत जातों हेंच.

म्हणून प्रेम, परस्पर प्रेम, मग तें शिवपार्वतीचें उदात्त, शुकरंभेचें शृंगार प्रधान, कृष्ण रुक्मिणीचें कृतक कोपयुक्त, रामसीतेचें साहजिक विशुद्ध कसेंही असो तें आपणांला आकर्षक वाटतें. त्यांतल्या भावना प्रामाणिक वाटतात आणि कल्पनेनें कां होईना आपण त्या प्रेमाचे अनुभवसुख घेतों व आपल्या अतृप्त प्रेमाकांक्षेनें थोडेसें समाधान होतें.

परंतु दुसऱ्या एखाद्याची प्रणयकथा ऐकून जो त्याविषयीं आपण उपहास प्रकट करतों त्यांत पुष्कळ वेळां जाणता अगर अजाणता मत्सर व असूया हींच असतात यांत शंका नाहीं. विवेक म्हणजे मत्सर नव्हे हें जितकें खरें तितकेंच परस्पराकर्षण म्हणजे नैतिक शैथिल्य नव्हे.

परंतु हें समजण्याला आपलें मन अदूषित असेल तेव्हां ना ?

# अकारण शत्रु

मनुष्य स्वभावाचें केव्हां केव्हां आश्चर्य वाटतें.

आणि केवळ आश्चर्यच नव्हे तर दुःख वाटणारीच गोष्ट आहे ही.

गुलाबाला कांटे असतात. ते हाताला बोचले कीं दुःख होतें. पण त्या स्वरूप सुंदर सुवासिक फुलाचें निदान ते संरक्षण करीत असतात. अशा वेळीं त्याच्यापासून होणारी इजा क्षम्य तरी ठरते. परंतु असें अनेक वेळ होत नाहीं. कां कीं रस्त्यानें आपण चालत असतां रस्त्यांत दबा धरून बसलेला एखादा कांटा चटकन टोचतो अगर समुद्रांतून होडी जात असतां पाण्याखालीं डोकें घालून बसलेला एखादा खडक होडी फोडून मोकळा होतो.

तीच गोष्ट या मानवी कंटकांची व विघ्नकारक फत्तरांची.

निसर्गांतले हे कांटे खडक सावधगिरीनें टाळतां तरी येतात. परंतु हे मानवी फत्तर कांटे केव्हां कुठें कसे उपटतील तें सांगतांही यावयाचें नाहीं. नुकसान करण्याला त्यांना कोणतेंही कारण लागत नाहीं. साप गरळ ओकतो, त्याच्या शेपटीवर निदान पाय पडलेला असतो. यांना दुसऱ्याला अपशकून करण्याला कांहींच कारण लागत नाहीं. दुसऱ्याचें कांहीं चागलें होतें आहे ना ? बस्स, त्यांत वाटेल तें करून विघ्न आणावयाचें एवढेंच यांचें ठरलेलें असतें. मला आश्चर्य वाटतें तें याच गोष्टीचें, या अकारण शत्रूची मनोरचनाच मुळींच समजत नाहीं.

त्यांना टाळणें म्हणजे अधिक संकट ओढवून घेणें.

रस्त्यानें जातांना कुत्रीं नाहीं का पाठीं लागत ? त्याच्या भीतीनें पळण्याचा प्रयत्न करणें म्हणजे त्यांचे कडचा चावा घेणें.

अहिंसेचे तत्त्व कितीहि थोर असो. पण अशा अकारण शत्रूंना सुटे ठेवणें व्यक्तिशः स्वतःला व समाजाला धोक्याचें असतें.

निदान माझा तरी विश्वास यावर आहे.

खोटयाच्या पाठींत सोटाच हवा !

माझा तर असा अनुभव आहे कीं आयुष्यांत सन्मान घेण्याचे जे थोडेसे प्रसंग मला लाभले त्या हरएक प्रसंगीं हें अकारण शत्रूंचें जाळें वाढतच गेलें आहे. माझ्या घरीं दीप लागला कीं यांच्या घराला आग कां लागावी ? सांगतां येत नाहीं. पण चमत्कार आहे खरा.

कोणाला खरें वाटणार नाहीं पण थंडीपासून संरक्षण व्हावें म्हणून मी ओव्हरकोट घातला कीं इकडे यांच्या अंगांत हुडहुडी भरूं लागते. डोक्यावर छानदारशी टोपी घातली कीं तिकडे त्यांचें माथें फिरूं लागतें. एखादें पुस्तक मी प्रकाशावें तिकडे त्यानीं आपलें एक पोर मेल्याचा विक्षेप करून सुतक पाळावें !

हाच अनुभव इतरांचा असेल. माझ्या दृष्टीनें तर याला एकच उत्तर सांपडतें—असूया—सुई सारखी हृदयाला टोंचत रहाणारी असूया !

आणि ही असूया जोंवर नाहींशी होत नाहीं तोंवर अकारण शत्रूंची संख्या वाढतच रहाणार. मग ते शत्रु उघड असोत वा गुप्त असोत, तोंवर कोणालाही आपल्या मागें अजात शत्रु हें विशेषण लावतां येणार नाहीं.

कारण तुम्हीं शत्रुत्व न कराल कदाचित्. पण तुमच्या भाग्योदयानें इतरांना सुतक लागणार त्याचें काय ? तुमच्या घरचा सुवेर त्यांच्या घरचें सुतकच नाहीं काय ?

## हा काय गाढवपणा ?

गाढवाला बोलतां येत नाहीं. म्हणजे त्यांचें हांहांवणें आपणांला कळत नाहीं. पण त्याला वाचतां आलें असतें तर त्यानें मनुष्य जातीवर बेअब्रूची फिर्याद केली असती खास ! गाढव जें करीत नाहीं, करण्याचें त्याच्या मनींही येत नाहीं अशी बेअकली कृत्यें करतों आपण आणि उगाच मात्र पश्चाताप झाल्यावर म्हणतों ‘ काय गाढवपणा हा ! ’

पण गाढव कधीं चार धोंड्यांना शेंदूर फांसून त्या पुढें नाक घासतो का ? पिंपळाचे पार पोरें होत नाहींत म्हणून झिजवतो का ? पाऊस पडत नाहीं म्हणून बेडकाची पालखींतून मिरवणूक काढतो का कधीं ? आपल्या पोरीबाळींना एखाद्या बंमहादेवाच्या गळ्यांत बांधून मोक्षाचीं दारें आपणाला उघडीं असें समजतों का केव्हां ?

हें सर्व करतों आपण. गाढव शहाणा आहे. त्याला माहीत आहे कीं जग झालें आहे, चालत आहे, चालणार आहे. देवळांत घंटा वाजवून तें बंदही होत नाहीं वा उत्पात होणार असतील तर थांबणारही नाहींत. त्याला एक तत्त्वज्ञान माहित आहे—भूक लागली कीं खावें, झोंप आली कीं झोपावें, राग आला कीं दुगाण्या झाडाव्या. मोक्षाचीं दारें उघडतील कीं नाहीं याची त्याला चिंता नाहीं. गाईला जिलबीचीं ताटें देऊन आपलें अगर कावळ्याला पिंड देऊन पितरांचें पोट भरेल असें त्याला वाटत नाहीं. त्याला पूर्ण माहीत आहे कीं हा मूर्खपणा आहे. हा मूर्खपणा करण्याइतका गाढव मानव नाहीं. तो सर्व मक्ता मानवाचा.

आणि इतकेंही असून मूर्ख मनुष्याला गाढव म्हणण्याची चूक

आपण करीत असतोंच. खरें म्हटलें तर आपण विचार करावयास हवा कीं बेडूक पालखींत घालून फिरविल्यानें पाऊस पडणार कसा ? बेडकाच्या अंगीं इतकी ताकद असती तर तो पावसाची वाट पहात डरांव डरांव करीत कां बसता ? दगडाच्या अंगीं आपलें कल्याण करण्याची शक्ति असणार कसची ? आणि या सर्व वेडेपणाचा अर्थ तरी काय ?

खरें म्हटलें तर मानवांनीं गाढवाला गुरूच करावें. त्यानें तत्त्वज्ञानाचे ग्रंथ नसतील वाचले. पण त्याला कांहीं गोष्टी पूर्ण समजल्या आहेत. व्हावयाचें तें होणार. जें होणार तें दूर करणें शक्य असेल तर आपल्याच प्रयत्नानें. पण प्रयत्न म्हणजे प्राक्तन नव्हे. हे नारायणा, हे मारुतीराया न म्हणतांही कोंबडा आरवतांच सूर्य वर येणार, फुलें फुलणार, पक्षी उडणार, उन्हें पडणार. पृथ्वी गिरगिरमाता खेळते आहे तोंवर दिवसरात होणार. असें जर आहे तर भलत्याच गोष्टीची उठाठेव हवी कशाला ?

पण मनुष्य ईश्वराला तर आपल्याच सारखा लाचार जारकर्मी, अधाशी, स्तुतिप्रिय समजतोच पण ज्यांच्या मनांत असला मूर्खपणा चुकून सुद्धां येत नाहीं अशा शहाण्या गाढवालाही आपल्यासारखा बेअकली समजतो, हें एक नवलच नाहीं काय ?

‘ गाढव तरी मनुष्याला हेंच सांगेल ‘बा मानवा, तूं कृपा करून माझें नांव तुझ्या मूर्खपणाबाबतींत घेऊं नको. ईश्वरानें घालून दिलेला नियतीचा न्याय तुला समजत नसेल. सर्व सृष्टी तुझ्या प्रयत्नावांचून अडून बसली आहे असें तुला वाटत असेल तर खुशाल वाटो. पण मला आणखी कां तुझ्या कोटींत ओढतोस ?

आणि या दृष्टीनें विचार केला तर अनेक ढोंग धत्तुरे करणाऱ्या मानवाला विचारावेसें वाटतें कीं हा काय गाढवपणा ? याचें नांव मानवत्व—त्याच्या करणीचें नांव संस्कृति ! त्यांच्या या ढोंगी आपलपोटया विचारांचें नांव धर्म—व या बेअकलीपणाच्या प्रदर्शनाचें नांव भक्ति, पूजा !

## अकारण मैत्री

उन्हाळा आला कीं माशा व ढेंकूण जसे वाढावयाचे तसेंच सन्मान काळ आला कीं निंदक व शत्रूही वाढावयाचेच. असले अकारण शत्रु वाढणें जितकें साहजिक तितकेंच अपरिहार्यही असतें. एखाद्या खाणावळींत वा एखाद्या पान—पत्त्यांच्या अड्डयांत तुमची टिंगल चालली होती असा वृत्तांत जेव्हां कोणी मला सांगतो तेव्हां मला त्याचें आश्चर्य वाटत नाहीं. मी त्यांना उत्तरतों ‘ मोटार वेगांत चालली कीं मागें धुरळा उडायचाच.’ परंतु मला आश्चर्य वाटतें तें अकारण मैत्रीचें. क्वचित् असें होतें कीं एखादी व्यक्ति केव्हां तरी कुठें तरी, कशी तरी भेटते; चार दोन क्षुल्लक प्रश्नोत्तरें होतात न होतात नी आपणांला वाटूं लागतें किती जवळचे आपण मित्र वर्षानुवर्ष आपण एकमेकांला ओळखत असावें फक्त नांव नव्हतें माहीत वा चेहरा नव्हता पाहिला ! आणि मग जें महाराज, आपण त्याच्याशीं व तो आपल्याशीं गांठीवर गांठी मारून ठेवलेलीं गुपितें सांगून टाकतों—मागाहून आपणांला वाटतें—हें असें आहे तरी काय ? वर्षानुवर्ष मनाच्या अगदी आंतल्या कप्प्यांत ठेवलेलीं गुपितें आपण याला सांगितलीं तरी कशीं ? आणि त्यानेंही पण ! आश्चर्य वाटतें तें अशा वेळीं.

पण अशी मैत्री जमते खरी. वर्षानुवर्ष ओळखीच्या माणसाला जें आपण सांगत नाहीं तें या व्यक्तीला आपण सांगून मोकळे होतों. आणि ती मैत्रीसुद्धां बगिचांतल्या ताज्या रंगवलेल्या बाकावर अजाणतां बसतांच जसा कायमचा पट्टा कपड्याला लागतो तशी. फास्ट कलर्ड, पक्की रंगित !

याहूनहि दुसरी एक गंमत आहे. कांहीं कांहीं व्यक्ती अशा असतात कीं ज्याना आपण पाहिलेलेंही नसतें—जातीनेंच नव्हे तर चित्रांतहि—पण इतकेंहि असून गट्टी अशी जमते कीं तशी सहोदर भावंडांचीहि नसते.

माझ्या मेजावर एकदां एकाच डाकेनें आलेलीं तीन पत्रें पडलेलीं होतीं. तिन्हीं तीन ठिकाणचीं. माझ्या एका मित्रानें तीं वाचून म्हटलें, तुझी न् यांची खूब गट्टी दिसते गड्या. काय शाळेंत एकत्र होतां कीं शेजारीं रहात होतां ?' मी हसलों न म्हणालों ' मित्रा खरें सांगायचें तर या तिन्ही व्यक्ति—दोन पुरुष व एक स्त्री—काळ्या आहेत कीं गोऱ्या, ठेंगू आहेत कीं उंच यापैकीं कांहींच मला माहीत नाहीं. एक आहे मिठाचा व्यापारी, दुसरा आहे गवई व तिसरी व्यक्ति एक आहे चांगली मातबर कुमारी—खरें विचारशील तर आमची मैत्री कशी याचें तुझ्या इतकेंच मलाहि नवल वाटतें तसें पाहिलें तर एकमेकांच्या अक्षरावरून जी काय आम्हीं एकमेकांविषयीं कल्पना करूं ती !

आणि या जगांत असे चमत्कार होतात खरे. जग जीवनयोग्य आहे असें वाटतें तें यामुळेंच. एका अकारण मैत्रीच्या पारड्याविरुद्ध शंभर अकारण शत्रूचें शत्रुत्व आपण वजनाला घालतों न् आपल्या लक्षांत येतें कीं खऱ्या एकमेव मैत्रीच्या पारड्याच्या तुलनेनें शत्रूचें

पारडें हलकेंच ठरतें. निंदकांचे अड्डे, शत्रूंच्या टोळ्या या घरमाशा-इतक्याच किंमतीच्या वाटतात ते याचमुळें. खरी मैत्री जात, पात, धर्म मत अनपेक्ष असते. मनाच्या एखाद्या समभावाच्या तारा जुळूं-द्यात. संगति–संगीताच्या मधुरपादनाला सुरवात होते व आयुष्याच्या सुखद दुःखद प्रसंगांत, सन्मान, अपमानाच्या प्रसंगीं ऐकूं येत रहातें–हें खऱ्या स्नेहाचें पार्श्वसंगीत.

म्हणूनच या अकारण मैत्रीचें महत्त्व व तीमुळेंच जग उपभोग्य वाटतें.

## शंभर टक्के शत्रुत्व

एका लेखकाची अशी एक गमतीची गोष्ट आहे. त्यांतील नवरा-बायकोनीं जणूं काय नित्य कलहाचें व्रतच घेतलेलें असतें. कारण क्षुल्लकसें होतें, मग तोंड वाजतें, तोंडा नंतर भांड्या कुड्यांचीं शस्त्रास्त्रें एकमेकांवर फेकलीं जातात. शेवटीं रुसणें रडणें होतें—एखाद्याला वाटावें, झालें, या जोडप्याचा संसार संपला—फिरून दुसऱ्या दिवशीं पहावें तों सकाळच्यावेळीं गप्पा मारताहेत. लहान मुलाचें कौतुक करताहेत. हें आहे तरी काय ?

मी जर मानसशास्त्रज्ञ असतों तर त्या नवराबायकोचे मेंदू तपासून पाहिले असते. मी जर लघुकथालेखक असतों तर सायं-काल, रात व प्रभात असे माझ्या कथेचे तीन प्रसंग वर्णिले असते. पण दुसऱ्याच्या संसाराची व्यर्थ उठाठेव करणें अशिष्टपणाचें अस-ल्यामुळें त्या जोडप्याच्या दंगलींत नवीन आणलेल्या चहा सिद्रीं ( Tea–set ) तील किती पात्रें दगावलीं, शरूताईच्या नाकावर टिच्चून हळदी कुंकवाला जाण्याकरतां आणलेल्या अस्मानी पातळावर

शाईचे किती डाग पडले, नवीन आणलेल्या चेंबरच्या कोशाचीं किती पिसें गळून पडलीं अगर कालच्या द्वंद्व युद्धांत फेकलेल्या लाटण्यामुळें नवरदेवाच्या डोक्यावर किती घन इंचाचें टेंगुळ आलें व सौभाग्यवतींचा पाय मुरगळल्यामुळें त्या किती वेळ रडत होत्या, परस्परांच्या अनुकंपेनें शेवटीं दोघांनीं एकमेकाला आपण किती क्षण–कोपी आहोंत त्याची कबुली देऊन फिरून झगडा न करण्याचीं वचनें कशीं दिलीं आणि शेवटीं—

थांबा, वरील सर्व गोष्टी सांगण्याची इच्छा असली तरी वाक्य विस्ताराच्या भयानें मला तें वाक्य अपुरेंच टाकणें भाग आहे. परंतु एक प्रश्न मात्र तुम्हांला काय वा मला काय सारखा डिवचत राहील कीं एवढ्या झगड्या नंतर सुद्धां तें जोडपें फिरून नांदूं कसें शकतें? उलट केवळ एखाद्याच शब्दानें आपल्या जन्माची मैत्री सुटत नाहीं काय ? दोन कुटुंबांतील मंडळी एकत्र आणणाऱ्या लग्न समारंभांतच दोन घराण्यांतील नवी अढी बसत नाहीं काय ?

या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी दिसतो याहून खोल अर्थ या प्रकरणांत आहे खरा. भांडखोर व्यक्ति मनानें दुष्ट असतातच असें समजणेंच मुळीं चुकीचें. उलट गोड गोड बोलणाऱ्या व्यक्तींतच अनेक वेळीं दुष्टपणाचीं बीजें दडलेलीं असतात. त्यांची जमिनीवर डोकावलेली पालवी सुंदर दिसली तरी मुळें विषारीच असतात. भांडखोरपणा हा तसें पाहिलें तर मनाचा उघड पणाच होय. मनांत कोणतीहि गोष्ट दीर्घकाल लपवूं न शकणाऱ्या व्यक्तीच भांडतात. चूक होते ती आपलीच. गोड गोड बोलणाऱ्या व्यक्तींशी आपण गोडव्यानें वागतों व भांडखोर व्यक्तींना खड्यासारखें बाजूला करतों.

तसें पाहिलें तर भांडखोरपणा थोडासा उपकारीच ठरतो. भांडखोर व्यक्ती तत्त्वनिष्ठ तरी असते. ती तत्त्वाकरतां भांडेल म्हणून दुष्टच ठरेल असें नाहीं. आणि मनाच्या या चागूलपणामुळेंच कलहसंभव अधिक असतो. मी एवढेंच विचारतों पूर्ण सूचना देऊन वाजत गाजत स्फोट पावणारा ज्वालामुखी व अचानक घसरून गांवच्या गांव पायांत बुडवणारा हिम प्रभात यांत अधिक नुकसान कशानें होतें ?

पण यांचा आपण विचारच करत नाहीं. कोणतीहि व्यक्ती आपल्या आवडी नावडीची असली कीं शंभर टक्के सावपणा वा शत्रुत्व त्याच्या गळीं बांधून आपण मोकळे होतों व आपल्या मैत्रीच्या भंगुरपणाचें कारण या अज्ञानांतच असतें.

खरी गोष्ट ओळखणाराच जाणतो कीं शंभर टक्के शत्रुत्व अगर मैत्री दोन्हीही विरळाच.

## ज्ञान हें वीष ?

एका स्थानिक पत्रांत मध्यप्रांताहून आलेल्या एका पत्रानें नवीनच डॉक्टरेट मिळविलेल्या व्यक्तीचें अभिनंदन केलें आहे. जॉर्जिअन काव्यांतील धर्म हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. या प्रबंधाकरितां या मान्यवर पंडितानें अत्यंत मेहनत घेतली व आतां आपल्या नांवापुढें मिस्टर अमुक तमुक एम्. ए. पी. एच्. डी. अशी उपाधी लावण्याला तो मोकळा झाला. त्याच्या मित्रांनीं त्यावर अभिनंदनपर तारांचा वर्षाव केला असेल, वर्तमान पत्रांनीं त्याचीं छायाचित्रें प्रकाशित केलीं असतील. भरपूर पगाराची प्रोफेसरकी त्याला मिळाली असल्यास स्थानिक संस्था त्याच्या गळयांत हार घालण्याकरितां सहा-

सात आणेही खर्च करतील. एकाद्या विद्यापीठातर्फे परीक्षा घेण्याकरतां तो आला तर सर्व शिष्ट संस्था मधमाशांप्रमाणें त्यावर तुटून पडतील पण—

इतकेंही असून त्यांची किंव करावीसेंच वाटतें. हें ऐकून मात्र तुम्हीं चकित व्हाल. एखाद्या ग्रॅज्युएटचा आव आणून तुमच्यापैकीं कांहीं म्हणतील प्रस्तुत लेखक पदवीधर दिसत नाहीं, त्याला स्वतःला पदवीचें पुच्छ नाहीं, म्हणूनच एम. ए. पी एच्. डी. सारखें गोंडेदार पुच्छ पाहून याची स्थिती शेपूट तुटलेल्या कोल्ह्यासारखी झाली आहे. मी वकील असतों तर प्रतिवाद केला असता कीं बाप हो, मी कोल्हा नाहीं कारण मी मनुष्य आहे. ईसाप सृष्टींतील कोल्ह्याला ईश्वर–दत्त पुच्छ होतें तें अपघातांत तुटलें. तुमच्या आमच्या पूर्वजांना लांब लचक पुच्छ होतें असें उत्क्रांतिवादी म्हणतात. तें तुटलें असलेंच तर त्यानंतर युगानुयुगांचा व सहस्त्रावधी पिढयांचा काळ लोटून गेला आहे. मला जसें पुच्छ नाहीं तसेंच तुम्हांलाही नाहीं तेव्हां मत्सराचा वा आत्मन्यूनतेचा प्रश्नच उद्भवत नाहीं. आणि इतकेंही असून मी त्यांची किंवच करतों. कारण—तोंच वार्ताहरे म्हणतो कीं प्रस्तुत पंडिताला या दीर्घ व्यासंगांत एका डोळ्याला मुकावें लागलें व दुसरा डोळा सुधारेलसें वाटतें. प्रस्तुत पंडित सद्यः एका हवाईग्रामांत विश्रांति घेत आहेत.

एका उपाधीच्या प्राप्तींत एका डोळ्याला संपूर्ण मुकणें व दुसऱ्या डोळ्याच्या शक्तीचें दान देणें हा सौदा माझ्या दृष्टीनें आंतबट्टयाचा आहे. एखादें विद्यापीठ एखाद्या शेपटाच्या मोबदल्यांत जर निसर्ग दत्त शक्तींचा अपहार करूं लागलें तर ती गोष्ट त्याज्यच समजली

पाहिजे, डोक्याचा भोपळा व हाता पायाच्या शेवग्याच्या शेंगा बनवून सर्व आयुष्याचा ‘ खाना खराब ’ करण्यांत अर्थ काय ?

अशा वेळींच ज्ञान हें वीष कीं अमृत हा प्रश्न उभा रहातो. जोंवर प्राप्त ज्ञानाला निसर्गदत्त इंद्रियांची भर करतां येत नाहीं तोंवर ज्ञानाच्या आशेनें इंद्रियशक्तींना मुकणें अज्ञानाचेंच ठरेल. अर्थात ज्ञानप्राप्ती व शरीरसामर्थ्य यांचा सम प्रमाणांत विकास होत असेल तर ती आनंदाची गोष्ट आहे.

तथापि जो समाज शरीर सौष्ठव, शरीर सामर्थ्य, इंद्रिय शक्ती यांच्या मोबदल्यांत ज्ञान प्राप्त करून घेतो तो अमृत मिळवीत नसून विषाचेच घोट घेत असतो. कारण वाण्याकडे भांडें घेऊन गेलेला मनुष्य भांड्याच्या मोबदल्यांत तेल खरेदी करूं लागला तर भांड्याला मुकतोच व तेलही त्याच्या हातचें सांडून जातें.

म्हणूनच ज्ञान हें वीष तर नव्हे अशी शंका येते व शरीर सामर्थ्य हें व्यस्त प्रमाणांत असेतो कोणीहि म्हणेल कीं तुमच्या उपाधींचा तुम्हीं वाटल्यास अभिमान माना आम्हीं त्याची अवहेलनाच करूं.

## फुल व कांटा

‘ सुख पहातां जंवापाडे दुःख पर्वताएवढें ’ ही जशी पुरातन कालपासून लोकांची तक्रार आहे तशीच ‘ जीवित नच हा हार फुलांचा कंटकयुत शय्या ’ ही नवीनांची ईश्वराविरुद्ध फिर्याद आहे. मानापमानांतील लक्ष्मीधराला हाडें सुद्धां लुसलुशीत लोण्याचीं केलीं असतीं तर काय बरें होतें असें वाटतें, त्याला हंसणाऱ्या शेंकडों

प्रेक्षकांचीसुद्धां हीच स्थिती असते. जगांतील दुःखें पाहून ईश्वरावर निर्दयतेचा आरोप करणारीं हीं माणसेंसुद्धां त्या लक्ष्मीधराचेच अवतार असतात. त्यांना वाटतें फुलें असावींत पण कांटे नसावेत शहर सभेनें रस्त्यावर खडी टाकून घट्ट रस्ता करण्याऐवजीं कापसाच्या गाद्या टाकाव्या अशी सूचना हे लोक करीत नाहींत हें नशिबच समजावयाचें.

परंतु सुखासीनांच्या तक्रारी ऐकूनहि ईश्वरनियुक्त जगत्सभेचे झाडू-वाले जगांतील दुःखांचें काठिण्य काढून सर्वत्र मऊमऊ करून टाकावयाला अजूनपर्यंत अवतरलेले नाहींत. आतां तर ईश्वराविषयीं निंदाव्यंजक ठराव आणून त्याला खुर्चीं खाली करावयाला लावण्यांत आली असल्यानें पुढेंहि पण जिकडे तिकडे निर्दुःख मऊपणाचें सुखाचें साम्राज्य होईल अशी आशाहि राहिलेली नाहीं.

तेव्हां जग आहे तसें घेऊनच आपणाला चाललें पाहिजे.

फुलें व कांटे हीं दोन्हीहि आपली परंपरार्जित जिंदगी.

फुलांचा वांटा उचलणाऱ्यांला कांटेहि उचलणें भाग आहे.

खरें पाहिलें तर कांटयानें कांटा काढतां येतो त्यामुळें दुसऱ्या कांटयाच्या निर्मूलनाकरितां कां होईना कांटा हा लागणारच. कांटा पहातांच अंगावर कांटा उभा रहाण्याइतक्या ज्यांची वृत्ती कोमल; अशांनीं सुख दुःखें कांटयावर तोलून दुःखाचें पारडेंच ज़ड भरतें अशी तक्रार करावी हें रास्त होय. पण तेवढ्यामुळेंच कोणी आपल्यास जग हेंच आनंदाचें आहे; जग फुलासारखें आहे, या तत्त्वाला कांटा मारण्याची जरूरी नाहीं.

कांटयाची चिकित्सा सुरू झाली कीं लहानपणाची एक गोष्ट मला आठवते. आम्हीं कांहीं मुलें टेकडीवर करवंदीची सुंदर पांढरी

शुभ्र चांदण्यासारखीं फुलें फुललीं होतीं तीं घोसच्या घोस खुडून एखाद्या रोमन सैन्याप्रमाणें जयघोष करीत खालीं उतरत होतों. इतक्यांत पायथ्याशींच दुसऱ्या वाड्यांतील एका टोळीशीं आमची गांठ पडली आमचा हिणवणारा जयघोष व फुलांची ऐटींत काढलेली मिरवणूक ही पाहून शत्रूसैन्याला आमच्या विजयी सैन्यावर घाला घालण्याची ईर्षा येणें साहजिकच होतें. त्यांनीं आमच्या टोळीवर तुटून पडून आमची विजयपताका हस्तगत करण्याचा सपाटा चालविला. मी माझ्या डाव्या हातांत फुलांचे गुच्छ धरले होते. मारामारीच्या वेळीं उजवा हात पाठीशीं होता. माझ्या हातांतील फुलें हिरावून घेण्याकरितां एक सैनिक पुढें येतांच मी उजव्या हातांतील काटेरी ' शिरटी'चा एक प्रहार त्याच्या हातावर केला व—

जगांत फुलांचें संरक्षण करणारे कांटेच असतात हें त्यांना, मला व इतरांना चांगलेंच कळून आलें.

तेव्हांपासून फुल पाहिलें कीं मला कांट्याची आठवण होते. कांटा हा शत्रू वाटत नाहीं. फल बहीण मानली तर कांटा तिचें संरक्षण करणारा भाऊ वाटतो.

आणि जगांतहि असेंच नाहीं का ?

दुर्जनापेक्षां सज्जनांना जगांत लोक अधिक फसवतात, अधिक त्रास देतात, दुर्जनापेक्षां सज्जनांनाच जगाचा वाईट अनुभव अधिक येतो, नाहीं का ? मला वाटतें त्याचें कारण एकच ते केवळ फुलें संग्रहींत बसतात परंतु त्याचबरोबर त्यांचें संरक्षण करणारे कांटेहि हातीं घेतले पाहिजेत हें विसरतात. प्रत्याघात करण्याची त्यांची तयारी नसते म्हणूनच जगांतील दुःखापुढें सुख जंवाएवढें असें त्यांना वाटतें.

त्याना मी एवढेंच सांगेन—
हातांत कांटे धरून तर पहा.

## निर्बुद्ध यंत्राचा श्राप !

एखाद्या भटानें दक्षिणा घ्यावयाची ती घेऊनहि अशिर्वादाऐवजीं श्राप उच्चारला तर आपणाला किती राग येईल ! मलाहि त्या यंत्राचा त्या दिवशीं तसाच राग आला. चोरानें एक आणा गिळला माझा व तोंडांतून बाहेर टाकली मात्र श्राप पत्रिका. तीं वाचतांच त्या यंत्राला बसवलेल्या आरशांत माझा चेहरा क्रुद्ध दिसूं लागला. यंत्राचा एकमेव हात डळमळूं लागला. ज्या औषधविक्याच्या दुकानांत हें यंत्र ठेवलें होतें त्याचें माझ्या हालचालीकडे लक्ष नसतें तर एका ठोशानें त्या यंत्राची दांतखिळी पाडूनच मी बाहेर पडतों. परंतु राग येतांच दहा अंक मोजावे म्हणतात. मी तर चांगले १२० अंक मोजले कारण त्या यंत्रानें मी न मागतां माझे भविष्य कथन करण्याचा लुच्चेपणा पत्करून माझ्या वजनाबरोबर मला श्रापहि दिला होता कीं ‘ तुमचें पंचविसावें वर्ष सुखाचें जाईल !’

त्या निर्बुद्ध यंत्राच्या नांवानें मी खडे फोडतो तो याचमुळें.

मी म्हणतों कीं या बीन डोक्याच्या, बीन प्राणाच्या निर्जीव ज्योतिषीबुवाला ‘ किस्मत ’ विचारलें होतें कुणी ? वजन सांगावें व आपलें वजन राखावें की नाहीं ? पण बेअकली यंत्रच तें. निंदास्तु-तीची पर्वा करणारे वसंत लाडोबा थोडेच !

मी वारंवार वजन करण्याचें कारण वेगळेंच होतें.

परवांच एक मित्र मला म्हणाला, ‘ गड्या, सद्यः तुझें वजन वाढून

राहिलें आहे ' तो कोणत्या अर्थानें म्हणाला समजत नाहीं. पण पूर्वी चार चार वर्षे अंगांवर टिकणारे कपडे आतां वर्ष भरानें थिटे पडतील अशी भीति वाटूं लागल्यानें शिंप्याकडे माप देतांना त्या अंदाजानेंच थोडी व्यासांत वाढ करावी हा व्यवहारीक हेतु माझा होता. पण त्या यंत्राचा तो श्राप ऐकतांच मात्र माझें वजन एकदम खालावूं लागलें आहे, लहानपणचें अंगडें टोपरेंच वापरावें लागणार अशी भीति मला वाटूं लागली. या सर्वांचें कारण त्या निर्बुद्ध दुष्ट यंत्राची श्रापवाणी !

एखाद्या नवविवाहित पण गतमातृक तरुणानें जोशी बुवांना हात दाखविला व त्यानें मोठा गंभीर चेहरा करून तुमच्या आयुष्यांत तुम्हाला मातृसुख अद्वीतीय दिसतें असा अभिप्राय व्यक्त केला तर त्या नववधूला किती राग येईल बरें ? आईच्या सुखाची थोरवी वर्णन करणाऱ्यानें पत्नीला अनुल्लेखानें कमीपणा आणावा हें तिला रुचेल काय ?

मला त्या यंत्राचा राग आला तो एवढ्यासाठीं तुम्हीं आम्हीं माणसें केवळ आशेवर जगत असतों. अनेक संकटें सहन करतों, खचून जात नाहीं वा जगण्याला कंटाळत नाहीं केवळ एकाच आशेवर—हेहि दिवस जातील व तीं सौख्य–संपदा घेऊन येणारी प्रभात आज ना उद्यां उगवेल—या आशेवर ! भूतकालाच्या थोरवी ऐवजीं भविष्यकालाच्या विभवाकडे आपलें लक्ष असतें. आयुष्यांतील एकमेव कां होईना वर्ष उत्कर्षाचें जाईल असें एखाद्यानें आपणांला सांगितलें तर त्या वर्षासाठीं कां होईना अनेक दुःखपूर्ण वर्षे काढण्याची आपली तयारी असते. म्हणून मंगळाची बाधा असो वा शनीची पीडा असो आपण साहूं शकतों. एकच आशा असते कीं यही दिन जायेंगे.

परंतु अशा वेळीं एखाद्या ज्योतिषानें भविष्यकालाला अनुल्लेखानें अंधारांत टाकलें तर पायाखालची फळी काढलेल्या वध्य माणसासारखी आपली स्थिती होते. भूतकालाच्या गर्भावस्थेंतील सुखापेक्षां भविष्यकालांतील स्वतंत्र स्थितींतील सुखच आपणांला हवें असतें. म्हणूनच त्या मानसविश्लेषणानभिज्ञ ( हा जाडा समाज मी विद्वत्ता प्रदर्शनाकरतां अगर चापेकरांचें अनुकरण करण्याकरतां वापरला नाहीं. मला ‘ कादंबरी कालच्या भूतकालाची आतां आठवण होत आहे. ती कादम्बरी वाचतांना कसें आगगाडींत बसल्यासारखें वाटतें नाहीं ? ) यंत्राचा राग मला आला तो याच कारणासाठीं.

## शिक्षक व कारकून

कारकून नांवाचा जो वर्ग आधुनिक शिक्षण योजनेनें तयार झाला आहे त्याची किंव आल्याविना रहात नाहीं. बिचाऱ्याचें आयुष्यच मुळीं असें कीं बहुसंख्यांकांना सकाळीं नऊ साडे नऊला जो कचेरीचा रस्ता पकडावा लागतो तो संध्याकाळीं सात साडेसाताला बगलेत हपीसचें पण घर कामाकरतां आणलेलें बाड मारून गृहदर्शन घेईपर्यंत एवढया दीर्घ परिश्रमानंतर लेखन वाचनादि विचार साधनेला वेळ व उत्साह तो काय रहाणार ? जुन्या गुलामगिरीच्या चालीत शरीरश्रमच काय होत ते. पण या नव—गुलामगिरींत देहकष्ट तर होतातच पण मेंदूचाहि कापूस होतो. कधी काळीं सुटी मिळालीच तर त्याचाहि उपयोग कांहीं आत्म—साधनाकडे करावा. पण मग बढती कशी मिळणार ? साहेबांचे चांगले शेरे कसे लाभणार ? अर्थात तीहि सरस्वतीच्या पूजेऐवजी साहेबांच्या खुषामतीत घालवणेंच त्याला

योग्य वाटतें. या मुळेंच कांहीं अपवाद सोडले तर आजचा कारकून वर्ग म्हणजे प्रगती खुंटलेला; देशांतील वैचारिक आंदोलनाशी सामाजिक आर्थिक—राजकीय तर नांवच नको अशा क्रांतीशी पूर्ण अनभिज्ञ असणारा एक लांकडाच्या ठोकळ्याचा वर्ग झाला आहे. त्याला नवविचाराचें वावडें असतें. देशांत नव विचारांचे वारे किती जोमानें वहात आहेत याची ओळखच नसते. मनुष्यत्वाचे स्वयंभू अधिकार काय याची जाणीवहि नसते. साहेब हा त्याचा देव, त्याचे बरे वाईट शब्द हा त्याचा कौल, त्याचे शेरे हा त्याचा प्रसाद, त्याची कचेरी हे त्याचें मंदिर, हा कारकून म्हणजे केवळ शंकरापुढचा ! '

मला जर आज खरोखर कोणाची कींव येत असेल तर ती हरिजनांची नाहीं, ते धर्मांतराची धमकी देऊन तुम्हांला नाक घासावयाला लावतील, गाडीला जुंपलेल्या गाढवाची नाहीं—ते चार लाथा मारून आपला सूड व्यक्त करतील, गिरणींतल्या मजुरांची नाहीं, ते संप करून तुम्हांला कांप पावायला लावतील, परंतु कारकुनांची. मला खरोखरच असें वाटतें कीं अमेरिकेंत गुलामाच्या उद्धारार्थ जशीं युद्धें झाली तशीं कारकून—दास्य—विमोचन युद्धेंहि झालीं पाहिजेत.

परंतु ही सहानुभुती फार टिकत नाहीं. कारण आजचा कारकून म्हणजे स्वत्व विसरलेला लांकडाचा ठोकळा तर बनला आहेच पण हा लांकडाचा ठोकळा सुद्धां धन्याचा आवाज आपल्या शिरोभागी उमटून घेऊन गरिबांचा, क्रांतीचा विरोधी शत्रु झाला जाहे.

उलट पक्षीं महिन्याकांठीं कमी पगार मिळणारा शिक्षक किती जिवंत असतो ! तो देशांतील नवविचाराशीं, क्रांती उत्क्रांतीशी जितक्य। लवकर समरस होतो तितक्या लवकर दुसरे फारच थोडे

वर्ग होतात. त्याचा व्यवसायच मुळी ज्ञानाच्या आदानप्रदानाचा असतो. गोखले, टिळक, आगरकर, चिपळूणकर,शास्त्री टागोर हे या देशाचे अगर वेल्स, कझिन्स वगैरे परदेशाचे विचार प्राणालीचे जनक शिक्षकच नव्हते काय ?

नव नव विचारांशीं, नवनव ऐतिहासिक घटणाशीं कालिक संबंध ठेवल्याखेरीज शिक्षकाचें चालणारच नाहीं. म्हणूनच त्यांचें जीवन जिवंत भासतें; नव नव उन्मेषशाली असतें. मासिक प्राप्तीची तुलना केली तर कारकुनाला आपल्या जमेचें पारडें जड दाखवितां येतें हें खरें पण त्याचें कारण त्याचा बौद्धिक पराक्रम नव्हे तर सद्यःची राज्यघटणा.

आणि ही आर्थिक परिस्थिती लक्षांत घेऊन सुद्धां हाच विचार येतो कीं ज्याला जिवनाचा उपभोग घेणें शक्य नाहीं, त्या उपभोगाला लागणारा उत्साह थेंबान् थेंब ज्यांतून पिळून काढला असेल अशा लाकडाच्या ठोकळ्यापेक्षां नव विचारांचें जल पिणाऱ्या, भूमातेशीं दृढ संबंधित होऊन भव्य वृक्ष होणाऱ्या रोपटयाचें आयुष्यच अधिक रमणीय नाहीं काय ? मला तर एखाद्या कारकुनानें लांब जीभ काढून आपल्या साहेबाच्या शब्दाचा प्रतिध्वनी काढून अनुकरण केलें कीं त्याच्या त्या हीन दीन स्थितीची किंवच येते व आजचा कारकून जर अशा परप्रत्ययनेय बुद्धीनें नवविचारांचा शत्रु झाला नसता तर उद्यांच्या साम्यवादांच्या युद्धांत ज्या वर्गाच्या उद्धाराकरतां प्रयत्न व्हावयाचे त्यांत ही त्याचें नांव मी घातलें असतें.

परंतु आज मात्र माझ्यापुढें दोनच तुलना आहेत—

कारकून म्हणजे निर्जीव ठोकळा

शिक्षक म्हणजे सजीव वृक्षक !

## हंसरा चेहरा

युगानुयुगें प्रस्तराच्या बंदिवासांत पडलेल्या एखाद्या लीलावृत्ती झऱ्याला लहानसें रंध्र मिळालें कीं तो जसा कारावासाचीं सर्व दुःखें विसरून धुईधुई वाहूं लागतो खट्याळपणें उड्या मारतो व क्षणाक्षणाला जलबिंदूच्या मौक्तिक राशी उधळत धांऊ लागतो तसें तिचें हास्य क्षणाक्षणाला, शब्दाशब्दाला तिच्या त्या टपोर डोळ्यांतून बाहेर फुटून गालाच्या शिळांवरून, ओठांच्या दऱ्यांतून, नाजूक हाताबोटांच्या झाडांझुडपांवरून वहात होतें. तो हंसरा चेहरा, ते खुदखुदून बाहेर पडणारे मंजुळ पण अनेकवेळ अर्थहीन शब्द, मधून मधून सकारण वा अकारण पतीकडे अपांग कटाक्ष फेकून कृतज्ञतेनें केलेलें मंदस्मित—च्छे:, मिनिटा मिनिटाला क्षणा क्षणाला रसरसून उतूं जाणारा तो आनंद अजूनहि मी आठवतों तीं आठवण झाली कीं इला व्हीलर बिल्कास्कनें महिला स्वभावाचें केलेलें अविष्करण—

A sense of humour
                and a touch of mirth
To brighten up the
                shadowy spots of earth.

मला पटूं लागतें. तीं स्त्री म्हणजे साक्षात आनंदमूर्ति असावी. त्या मूर्तिकडे पाहून कोणीहि असेंच म्हणतो कीं प्रीतिज्योतिच काय ही उजळली कीं शारदा, की रमा ?

परंतु एक गोष्ट आपणांला सांगितलेली नाहीं. ती गोष्ट दुःखाची आहे. याच स्त्रीला सहा महिन्यापूर्वीं कुणी पहाता तर तिचा चेहरा अभ्राच्छादित इंदूप्रमाणें निस्तेज, कोमेजलेला दिसला असता.

चिंतेच्या रेषा भालप्रदेशावर दिसल्या असत्या. जगांत आनंद आहे यावर तिचा विश्वास बसला नसता.

मी जेव्हां वरचें चित्र पाहिलें व घरीं आलों तेव्हां तिच्या त्या दुर्दमनीय आनंदा शेजारीच दुसरें चित्रहि दिसूं लागलें. माझ्या एका मित्रानें आयुष्यांत हें एकमेवच सत्कृत्य केलें असतें तरी मी याची प्रशंसा व प्रशंसाच फक्त केली असती. कारण मित्रानें दाखविलेलें धैर्य, सोसलेला अपमान यामुळेंच त्या स्त्रीच्या चरित्रांत फिरून आनंदाचा जन्म झाला होता. ती स्वतः आनंदी झाली होती व तिच्या सहवासांत येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला अमूप हस्तें आनंदाची वाणें वाटत होती. परंतु सहाच महिन्यापूर्वी ती तशी दिसली असती का ?

नाहीं, कारण ती विधवा होती. हिंदु विधवा होती व विधवांचे कर्मभोग तिच्याहि मागें लागले होते. अशा वेळीं तिच्याशीं विवाह करण्याचें धैर्य या मित्रानें दाखविलें व कोरडें पडलेलें पात्र दुथडी वाहूं लागलें, ही साधीच गोष्ट, तो हंसरा चेहरा आठवला कीं मनुष्यानें मनांत आणलें तर एखाद्याच कां होईना सत्कृत्यानें मनुष्य दुसऱ्या व्यक्तीचा उभा संसार किती सुखमय करूं शकतो तें मला स्पष्ट दिसूं लागतें. विझलेला दीप केवळ एखाद्या काडीनें पेटतो व अंधाराचा नाश होऊन कोनान् कोपऱ्यांत हंसरा प्रकाश पसरतो !

## ध्येय व तारतम्य

एका तरूणीची सांप्रत स्थिती माझ्या दृष्टीपुढें जेव्हां जेव्हां येते तेव्हां तेव्हां विषण्णता उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. तिला तरुणी म्हणावयाचें तें वयाच्या बाबतींत मात्र ! खरें म्हटलें तिच्या चेहऱ्या-

वरील अवकळा व दृष्टींतील उदासीनता यामुळें तिला वृद्धा म्हटलें तर त्यांत त्या व्यक्तीला अन्याय केल्यासारखें होणार नाहीं ती एक विदूषी आहे. कांहीं वर्षांपूर्वी तिनें व्यासपीठावर जिव्हास्त्रानें मी मी म्हणणाऱ्या पंडिताना नमविलें होतें, तिच्या लेखणीची धारहि जहाल होती पण आज मात्र या जिवंत देहांत प्राणाची मशाल नसून धुक-धुकता अंगार तेवढा राहिला आहे. एक वेळ असा होता कीं माझ्या माहितीचे अनेक युवक तिच्या परिचयाचे तान्हेले असत व तिच्या एखाद्या हास्ययुक्त शब्दानेंहि त्यांना धन्यसें वाटत असे, परंतु ज्यांनीं ज्यांनीं तिच्या प्रेमप्रसादाची अपेक्षा केली त्यांच्या त्यांच्या पदरांत उपहासाची आगच पडली व आज याच तरुणींची अशी स्थिती आहे कीं रस्त्याच्या एका बाजूनें ती येत असली तर हेच तरूण दुसरीकडे तोंड फिरवून चालते होतात व तिनें जुना परिचय शोधून काढण्याचा प्रयत्न केला तर तुसडें उत्तर देऊन मोकळे होतात.

प्रस्तुत तरुणीच्या या अकालशोकपर्यवसनाला माझ्या मतें मात्र एकच कारण झालेलें आहे. प्रस्तुत तरुणांची स्वतः विषयींची विप-र्यस्त अहंवृत्ती हें तर त्यांतलें एक कारण खरेंच पण तिनें प्रत्येक तरुणाला लावलेली ध्येय पुरुषांची परम कसोटीच तिला नडली असावी. प्रत्येक तरुण हिटलेर अगर मुसोलिनी होऊं शकत नाहीं व दूरता:पर्वता:स्या: या अनुभवांच्या बोलाप्रमाणें त्यांचें जें आपण विभूतिमत्व ऐकतों तें जवळ जातां तितकेंच दिसेल असें नाहीं. प्रस्तुत तरुणीच्या मतें तिचें पाणिग्रहण करूं इच्छिणारा वर ताकदीनें सिंह, योग्यतेनें जवाहीर, रूपानें मदन त्यागानें पतंग असा सर्वगुण विशिष्ट असावयास हवा होता, त्याला टेनिसची रॅकेट व फिडलवरचा गज

सारख्याच सफाईत फिरवतां येणें जरूर होतें त्यानें मागणी करावयास यावें तें रोल्सराइस मधूनच! याशिवायहि रुबाबानें तो रोनाल्ड कोल्मन असावा, क्रॉस बिंगीसारखें गोड गळ्यानें त्यानें प्रेम कविता गाव्या, मॉरिस शेव्हेलियरच्या थाटांत त्यानें शृंगार करावा या व अशा सीनेमा पाहून उचललेल्या अटी होत्याच. परंतु तिच्या ओळखीच्या १००१ तरुणांपैकीं एखाद्यांतहि ब्रम्हदेवानें असे छत्तीस गणी व बाव्वीस लक्षणी रत्न पैदा न केल्यानें तिला एकहि वर पसंत झाला नाहीं. आणि आज रोल्स राईस तर सोडाच पण पंक्चर झालेल्या सायकलवरूनहि तिच्या दारी कोणी जाऊं इच्छित नाहीं.

ही तरुणी एखाद्या दिवाभीताप्रमाणें रस्त्याच्या कडेवरून अधोवदन चाललेली दिसली कीं तिच्या ध्येयलालसेचें झालेलें हें पोतेरेंहि दृष्टीपुढें आल्याशिवाय रहात नाहीं. ध्येयाला व्यावहारिक दृष्टीचा दोरा नसल्यानें वाऱ्यावरून उडालेला हा पतंग आतां तारेच्या खांबाला अडकून त्याच्या तांबड्या हिरव्या चिंधड्या मात्र फडफडत राहिल्या आहेत.

परंतु या तरुणीच्या डोक्यांत ही ध्येय लालसेची धुंदी चढली नसती, थोडेंसें तारतम्य, थोडीशी व्यरहारदृष्टी याच्या पापुद्र्यांतून तिनें प्रत्येक तरुणाकडे सूक्ष्मदर्शक कांचेतून पाहतांना पाहिलें असतें तर हें शोक चित्र तिच्या एक वेळच्या चहात्यांस आज पहावें लागलें नसतें!

पण असें मी म्हणणें हा केव्हढा वेडेपणा! वाचक चटकन पुस्तक उघडतील जाडजूड ग्रंथ पुढें करतील व सांगतील की नॉट फेल्यूअर बट लो एम इज क्राइम! यावर तुम्हीं काय उत्तर घाल?

## सौंदर्य व उपयुक्तता

कांहीं कांहीं लोकांचें मला आश्चर्य वाटतें.

लोकांची कोणतीहि गोष्ट आवश्यक वा अनावश्यक हें ठरविण्याची दृष्टी ठरलेली असते. अमुक एक वस्तू हवी काय ? असा प्रश्न येतांच ते मनाला विचारतात—त्याची आपणाला जरूरी आहे का ? त्याचा उपयोग आहे काय ?

उपयोग नसतो कशाचा ? रस्त्यावरच्या मातीपासून आकाशांतल्या रज कणांपर्यंत सर्वच वस्तू उपयोगाच्या असतात.

मग या उपयुक्ततावाद्यांच्या व सौंदर्य पूजकांच्या म्हणण्यांत वागण्यांत भेद तरी कुठें पडतो ?

पडतो तो इथेंच कीं हे उपयुक्ततावादी केवळ पाशवी उपयोगाकडेच पहातात. मनुष्य हा केवळ पशु नव्हे हें यांना पटतच नाहीं. उत्क्रांतीची सर्व तत्त्वें शिकूनहि ते मनुष्याला वेगळा मानायला तयार नसतात.

बाजारांतून एखाद्यानें गुलाबांच्या फुलाचा सुंदर गुच्छ आणला तर हे लागलीच म्हणतील ‘ बाबारे, हे पांच सहा आणे तू व्यर्थ कां दवडलेस ? बरें, ही निरर्थक उधळपट्टी केलीस ती केलीस आतां निदान त्याचा गुलकंद तरी करून खा म्हणजे चार दोन पौंडाची शरीरांत भर तरी पडेल.

म्हणूनच त्यांना जर आपण गुलाबांच्या फुलांचा तुरा देऊं लागलों तर ते म्हणतील ‘ नको नको, त्याहून भोपळयाच्या फुलांचाच गुच्छ कां द्या ना ! घरीं जाऊन मी ‘ती’ला त्याची कोशिंबीर तरी करायला सांगेन.

अशा तऱ्हेनें ज्या ज्या गोष्टी मूळ पाशांवी आवश्यकतेच्या बाहेरच्या आहेत त्यांची किंमत ते शून्य ठरवितात. मुरलीपेक्षां फुंकणींच ते अधिक योग्यतेची मानतातँ. मुरलींतल्या सुंदर आलापांनीं जोंवर भात शिजून तयार होण्याचे लागले नाहींत तोंवर तरी ते फुंकणीचें फूं, फूं अधिक योग्यतेचेंच मानतील !

हींच गोष्ट परवां झाली. एका तरुण गृहस्थाचें वाङ्मयावर व्याख्यान झालें. आमच्या या उपयुक्ततावाद्याना वाटलें काय व्यर्थ कालक्षेप हा ! वाङ्मयावर चर्चा केली असती तर ती अधिक उपयोगी नसती का झाली ? आणि शेवटीं हारतुरे दिल्यावर गुच्छातल्या गुलाबांच्या फुलांपेक्षां शेवग्याच्या कोंवळ्या पालवीकडेच त्याचें लक्ष गेलें व ते म्हणाले " बाबारें, तू बाजार भावाची चर्चा करण्याऐवजीं वाङ्मयाची रपेट करण्यांत वेळ तर घालवलासच. एवढयांत बाजारांतून तीन मण भाजी आणतां आली असती. निदान आतां असें तरी कर, ह्या तुऱ्यांतल्या कोंवळ्या पाल्यांची घरीं जातांच भाजी करायला घरांत वर्दी दे. वाङ्मयाची चर्चा करून घरांतला चहा तर नाहींच होत,निदान या कालव्ययानें मिळालेल्या तुऱ्याची भाजी तरी होऊं दे."

उपयुक्ततावाद्यांची जी दृष्टी असते ती ही अशी. काव्य रसाचा आस्वाद घेण्यापेक्षां कोंबडीचा रस्साच ते मिटक्या मारून खातील व ब्रह्मांडांच्या सौंदर्यावलोकनापेक्षां कुक्कुटांडांचें पुडिंग त्यांना मोलाचें वाटेल.

सौंदर्य दृष्टीचा रसिक मात्र त्या दिवशीं असेंच म्हणाला असतां कीं काव्यचर्चेनें आपलें मन तर आपण प्रसन्न केलेंच आतां या तुऱ्यांतली गुलाबाचीं फुलें घरांतल्या वेणींत खुपसून ज्या ज्या 'अय्या' म्हणून भुरका मारतील त्याचाच भुरका मारावा म्हणजे या काव्यपानाचें सार मिळाल्यासारखेंच !

# गुंडांचे पायचेंडू

गुंड कधीं सामान्य होईल काय असा प्रश्न सहज सुचणारा आहे पण केव्हां केव्हां सामान्याला गुंड होणें भाग पडतें. अशा वेळीं कोणी किती नाकें मुरडलीं अगर महिला मंडळांत 'इश्श ! तारूचा नवरा अगदींच गुंड बाई. परवा म्हणे गाडीवाल्याशीं भर रस्त्यांत मारामारी केली !' म्हणून एकमतें त्याच्या निषेधाचा ठराव नळाच्या तोटीपासून शंकराच्या पिंडीपर्यंत पसार होऊन गेला तरी असल्या या सामान्य गुंडाविषयीं मला आदरच वाटतो. परवांच पुण्याच्या एका सभेंत सभा मोडण्याच्या आवेशानें आलेल्या कांहीं गुंडांना अशाच गुंडगिरीचा इषारा देऊन चूप बसवावें लागलें होतें व त्यानंतर एका सुशिक्षितानें वाटल्यास कोंवळ्या सभ्य शब्दांत निषेध करण्याऐवजीं हाताच्या बाह्या वर साराव्या याबद्दल वादळहि झालें होतें. तथापि मला जर एखादा सुशिक्षित भेटला तर मी त्याला असेंच सांगेन कीं बाबारे, आतांचे दिवस वेगळे आहेत. शाब्दिक निषेधाचे दिवस संपले. मारामारी करणें, चार दोन ठोसे देणें अगर घेणें यांना भिऊन वागण्याचे दिवस गेले. आतां सुशिक्षितांनी गुडागिरी शिकण्याचे दिवस आले आहेत. खिशांत झरणी अडकवणें जसें अद्यावत सुधारणेचें लक्षण तसाच बगलेत सोटा असणें मर्दपणाजें लक्षण मानलें पाहिजे.

आणि हे विचार येण्याचें कारण परवांच माझा एक मित्र माझेकडे आला व म्हणूं लागला 'काय करणार मित्रा, इकडे आलेला एक उपटसुंभ व्यापारी मी त्यांच्या कडचा माल घ्यायचा नाकारला एवढ्याच कारणावरून माझ्या आणि माझ्या बायकोसंबंधीं वाटेल तें अश्लाघ्य बोलत चालला आहे. काय रे, त्याला सभ्यता मुळींच कशी नाहीं ?

एक खरमरीत पत्र लिहून त्याची मी अश्शी हजेरी घेणार आहें म्हणतोस ! ' वगैरे वगैरे.

मी म्हटलें, ' अकलेच्या कांद्या, तुझ्या विषयीं अगर तुझ्या बायकोविषयीं तो जें काय सांगत सुटला आहे तें योग्यच आहे. तुम्हीं दोघें शिक्षणाची बाहुली आहांत. सभ्यतेच्या कल्पनेनें तुमचें शेणमेण झालें आहे असल्या या बाहुल्यांचा जर त्यानें खेळ मांडायचा नाहीं तर त्यानें काय माळणीविषयीं बोलून जुती खावीत कीं मच्छिवालीविषयीं बोलून तिच्या मुस्याला बळी जावें ? तुझ्या या शाब्दिक निषेधाला तो केव्हांच बगलेत मारील. उलट तुझें पत्र त्याला आणखी उत्तेजन मात्र देईल. '

मग मी काय करूं ?

अंगांत ताकद असेल—नसली तरीसुद्धां—तू एखाद्या सार्वजनिक अड्डयावर त्याला गांठ जाहीरपणें बोलण्याचें आव्हान दे आणि या ना त्या निमित्यानें त्याच्या पाठीवर चार रट्टे दे कीं त्यांचें तोंड बंद पडतें कीं नाहीं पहा !

खरें म्हटलें तर स्वसंरक्षण ही नैसर्गिक प्रतिक्रिया आहे. परंतु सद्यःच्या कागदी शिक्षणानें सांप्रतच्या पिढीला जशी नाजूक कचकड्याची बाहुली बनविली आहेत तशीच त्यांची अस्त्रही अगदीं ठिसूळ केली आहे. याचा फायदा मात्र खरोखरीच्या पुंडाना भरपूर मिळतो. एखादा गाडीवाला अगर बंदरावरचा मजूर या सुशिक्षित बाहुल्यांची कुतरओढ कशी करतो त्याचें चित्र कुठेंहि पाहतां येईल. परंतु जर या बाबू लोकांपैकीं एखाद्यानें प्रतिक्रिया म्हणून पायांतलें काढलें तर त्याचाच समाज त्याला असभ्य गुंड अगर मवाली ठरवतो. समाजाच्या नेभळेपणामुळें मनाची विकृत अवस्था कशी होते पहा.

म्हणूनच आजच्या सुशिक्षितांनीं थोडासा गुंडपणा करण्यास शिकणें अगदीं जरूर आहे. मुख्यतः मध्यम वर्ग म्हणजे तर अशिक्षित मवाली व श्रीमंत गुंड यांच्या लाथांनी इकडे तिकडे फेकला जाणारा पायचेंडु झाला आहे. कोणीही यावें याच्या कमरेंत लाथ हाणावी व या सन्मान्य सुशिक्षित सद्‌गृहस्थानें जास्तीत जास्त प्रतिकार करावा तो म्हणजे तोंडी निषेधांचे शब्द सुद्धा असे जपून वापरावे कीं एखादा अपशब्द चुकून तोंडावाटे आला तर बस्स यांच्या अब्रुची नाजूक बाहुली फुटून शतशः विदीर्ण झालीच.

परंतु मला मात्र असल्या षंढ सन्मान्य सुशिक्षिताची कींव करावी तेवढी थोडीच वाटते. हे सन्मान्य हात असून थोटे, पाय असून लंगडे झाले आहेत. असले हे मासाचे गोळे वरच्या व खालच्या वर्गांच्या सामन्यांत पायचेंडु ठरले तर नवल कसलें ?

## सर्वच वेडे

प्रत्येक मनुष्य वेडा असतो असें मी म्हटलें तर माझ्याच शहाणपणाविषयीं पुष्कळ वाचकांना शंका येईल. परंतु प्रत्येक मनुष्याला कोणत्या ना कोणत्या प्रकारचें वेड असतेंच; किंबहुना असें वेड नसणाऱ्याच्याच मेंदूविषयीं साशंक होण्याला जागा आहे असें म्हणणें फारसें चुकीचें होणार नाही. मुसोलिनीचें वीणावादन, जॉर्ज बादशहांचा तिकिटसंग्रह, रवींद्रनाथांचें चित्रलेखन हीं एक प्रकारचीं वेडेंच आहेत. आपण सिगारेटस्‌वर सिगारेटस् फुंकतों, उगाच नाक खाजवतों, नखें कुरतडतों, केंसावरून हात फिरवीत बसतों, या अगर असल्या

प्रकाराचें समर्थन एरव्ही कसें करणार ? प्रत्येक माणसाला जें एखादें वेड असतें असें मी म्हटलें तें या मुळेंच.

पण वेड्यांतहि शहाणपणाचें वेड व मूर्खपणाचें वेड असे फरक आहेतच. दुसऱ्यांची विनाकारण टवाळी करीत बसण्याचें वेड दुसऱ्याच्या बोलण्यांत अकारण नाक खुपसून टीका करण्याची संवय यांत कालव्यय थोडा थोडका जातो असें नाहीं. या प्रकारांचें समर्थन वेडाही करूं शकणार नाहीं. मग शहाणा कसा करणार ? उलट एऱ्हवी गंभीर ज्ञानी भासणाऱ्या व्यक्तींना असा एखादा नाद असतो कीं त्यामुळेंच अती ज्ञानी हेहि एक प्रकारें वेडेच ठरतात. रौप्य चषक गोळा करणाऱ्या एका व्यक्तीला नीरोने वीष दिलें व सर्वसंग्रह स्वतः पटकावला. कित्येक शिरस्त्राणें तर कित्येक पादत्राणें गोळा करीत फिरतात. पहिल्याला गणेश टोपी व दुसऱ्याला शालजोडींतले मिळाले तरी तो आपल्या संग्रहांत नवीन भर पडली म्हणून आनंदच मानील. दगड गोळा करीत फिरणाऱ्याला हिऱ्यांची खाण मिळाली तर जसें आश्चर्याचें नाहीं तसेंच असल्या या विक्षिप्त संग्राहकांच्या तिजोरींतून कधी प्राणी सृष्टींतील वा मानवी इतिहासांतील चुकलेले परंतु अत्यंत महत्त्वाचे दुवे मिळावेत याचेंहि आश्चर्य नाही. उलट असल्या या वेडयांचा जामदारखाना जर एखाद्या अभ्यासकाच्या हातीं पडला तर अनेक वादग्रस्त प्रश्नांवर चुटकी सरसा उजेड पडेल. शिवाजी साक्षर होता कीं निरक्षर, क्लिओपाट्रा केसांना कोणतें तेल लावी हे किंवा असलेच कमी अधिक महत्त्वाचे प्रश्न असल्या वेडयांच्या जामदारखान्याची किल्ली मिळाली तरच सुटतील.

एका शास्त्रज्ञाच्या भेटीचा योग मला नुकताच आला. या गृहस्थांचें

व्यवसायिक नातें, अंतरीक्षांतील ग्रह, गोल, तारे नक्षत्रें यांच्याशीं असलें तरीं आकाशांतील या संपदेपेक्षां डाक खात्याच्या तिकीटांचा प्रचंड संग्रह करावा, दुर्मिळांत दुर्मिळ मुद्रा जमा कराव्या, त्याचे देशिक कालिक, चैत्रिक वर्गीकरण करावें याचेंच या गृहस्थाला भारी वेड दिसलें. मी विचार केला कीं या अवाढव्य उद्योगानें पदरांत काय पडणार ? त्यापेक्षां दश कोटी राम नामाचें उदक सोडलें असतें तर निदान त्या ऐवजावर स्वर्गापर्यंतचा प्रवास तरी मजेंत नसता का झाला ? पण याच संग्रहांच्या बाडांत सिंध प्रांतांतील १८१४१ सालच्या डाकेच्या तिकीटापासून १९३६ तील एडवर्ड बादशहापर्यंतचा, उंटाच्या तांडयापासून तो हवाई जहाजापर्यंतच्या डाकखात्याचा प्रगतीचा जगांतील डांकखात्याच्या मुद्रांतील प्राणि संग्रहालयापासून तो दोन्ही गोलार्धांतील शास्त्या, कर्तृत्ववान पुरुषांच्या मुखवठ्याचा तो विलक्षण ऐतिहासिक घडामोडींचा पट जेव्हां मी अर्ध्या पाऊण तासांत अवलोकन केला तेव्हांच मला कळलें की हें वेड, असले छंद ही एक तपस्या आहे. असले नादिष्ट व तपस्वी यांत अंतर फार थोडें आहे. नादिष्ट आनंदांत भर टाकीत जातो, तपस्वी मनावरचा त्राण वाढवीत जातो.

हें पाहिल्यावर ‘मिस्टर डीड्स् गोज टु टाऊन’ या चित्रपटांतील गांवठी गृहस्थ न्याय मंदिरांतील न्यायाधिशापासून शिपायापर्यंत, वकीलापासून अशिलापर्यंत सर्वच वेडे असतात हें सिद्ध करतो त्याची आठवण झाली तुम्हीं आम्हीं सर्वच जण काहीं अंशी वेडे आहोंत.

फरक असला तर वेडेपणाच्या प्रकारांत व त्याच्या परिणामांत !

## उन्दरानें पोर घातलें, हत्ती झाला

जातकांतल्या एका कथेचा नायक फार भाग्यवान आहे. त्याला रस्त्यावर पडलेला एक मेलेला उन्दीर मिळाला म्हणून तो लक्षाधीश तर झालाच पण लक्ष्मीबरोबरच त्याला गृहलक्ष्मीहि मिळाली. आज काल मेलेला उन्दीर दिसला तर प्लेगची भीति वाटते. भर जंगलांतून जातांना वाघ अगर सिंह भेटला तर जेवढी भीति वाटणार नाहीं तेवढी भीति मेलेल्या उन्दराची वाटते. पण आमचा जातक-कथेंतला नायक एका मेलेल्या उन्दराच्या प्राप्तींत लक्षाधीश होतो व संसारधीश होऊन फटाकडी बायकोहि मिळवतो.

मेलेल्या उंदराची कुंडली मोडून एक ज्योतिर्गणिती निदान सांगतो कीं जो हा उन्दीर उचलील तो धन्य. एक वाटसरू तें ऐकतो व तो हा प्राणी अलग उचलतो. इतक्यांत त्याला एक मांजराचा धनी दिसतो त्याला भूक लागते. द्विपाद एक पैसा देऊन तो मृतात्मा खरीदतो. एका पैशाचा गूळ घेऊन व रांजणभर पाणी घेऊन आमचा नायक थंडा-पानी-शाप खोलतो. एका पैशाचे चार, चाराचे चाळीस, चाळीसाचे चारशे होत होत आमच्या नायकाच्या पेढींतील रक्कम इतकी वाढते कीं बाहेर देशाहून आलेली मालाची एक अख्खी बोट तो केवळ आपल्या श्रीमंतीच्या देखाव्यावर ‘ सट्टल ’ करतो. ( अर्थात् तो त्या जहाजाचा सट्टा मारतो. ) जहाज ताब्यांत येतांच हजारांचे लाखों होतात. एवढें झालें कीं या श्रीमंत सकल गुणालंकरण लक्ष्मी-चंदाच्या गळ्यांत त्या ज्योतिर्गणित्याचा ज्योतिष्प्रभा अशी कन्यका हार घालते. ( हें काय आधुनिक कथा वाचकांस सांगावयास हवें ? )

या अद्भुत रम्य सौभाग्य कथेचें सेवन करणाऱ्या वाचकाला आपण त्या जागीं असतों तर काय बहार होती असें वाटल्याशिवाय राहील काय ? लक्ष्मी मिळूनच्या मिळून वर सुन्दर गृहलक्ष्मीचेंहि कन्यादान करणारा हा भाग्यदाता मृतात्मा मूषक आपल्या दृष्टीस पडता तर !

पण दुर्दैवानें आपली द्वाड चिकित्सा या अद्भुत स्वप्नांतून जागी करण्यास आलीच तर किती प्रश्न उभे राहतील पहाः—

त्या मांजराला रस्त्यांतून घेऊन जाण्याची जरूर काय ? त्याच्या कोठारांतील सर्व उन्दरानीं बोकेशाही विरुद्ध संप केला होता काय ? केला असल्यास एखादें कमिशन कां नेमण्यांत आलें नाहीं ? नेमलें असल्यास त्याचा रिपोर्ट ? उन्दीर कशानें मेला ? तो ग्रंथीज्वराचा नसावा अशी खात्री कशावरून ? त्या मृतात्म्याच्या कुंडलींत इतके बलवत्तर ग्रह होते तर ज्योतिषी बुवानींच तो कां उचलला नाहीं ? कां आपलें कन्यारत्न कोणाच्याही पदरांत टाकण्याकरतां त्यानीं ही बुद्धीपुरस्सरच युक्ती केली होती ? त्या उंदराच्या आलेल्या एक पैशाची विडी घेऊन शिलगावण्याचा मोह नायक मजकुरांस कां झाला नाहीं ? एका पैशावर थंडा-पानीं शाप ( शीतोदक मंदीर वा कोल्डड्रिंक शाप म्हणा हवें तर ) काढणाऱ्या नायकाची जात भैयाची नव्हती कशावरून ? कीं त्या कालीं जातिभेद नव्हता ? एक पैशाचा गुळ किती माणसांना पुरेल ? त्यावर व्यापार करीत असतो तो स्वतः काय खाई ? कीं वायु-भक्षण करून राही ? उपाशींच रहात असल्यास तो जगला कसा ? खात असल्यास पैसे शिल्लक राहिले कसे ?

हेच काय—अशा एकामागून एक हजारों प्रश्नांची सरबत्ती आपली फाजील चिकित्सावृत्ती करील पण मला छापखान्यांतील प्रश्न चिन्हाचा

संग्रह आतांच संपला असेल अशी भीति वाटते म्हणून ते प्रश्न अध्याहृत ठेवतों. खरें पाहिलें तर या जातक कथेचा लेखकच काय आजचा एखादा किर्लोस्करांच्या उद्योग—उत्साह आत्मोन्नतीचा लेखक झाला तरी तो भिक्षाधीशाचा लक्षाधीश कसा झाला अशीं चरित्रें लिहावयास बसला कीं असलीच एखादी अद्भुत रम्य गप्प ठोकून आपल्या चरित्र नायकाच्या डोंगराएवढ्या श्रीमंतीचें मूळ चिंचोक्या एवढ्या प्रारंभांत आहे असें छातीठोक सांगून मोकळा होतो.

परंतु खरोखरच असें असतें काय? पैशाकडेच पैसा जातो हें खोटें काय ? उन्दरानें पोर घातलें व त्याचा हत्ती झाला असल्या सांगण्यांत अर्थ असतो काय ?

याचा विचार करूं लागलों कीं अर्थशास्त्र पुढें होतें व तें पुढें सांगतें कीं या सर्व अद्भुत रम्य कथा केवळ भाकड कथा आहेत. त्यांत सत्य तर नाहींच जें आहे तें सत्याचा इथून तिथून ठणठणाट.

# दुसऱ्याला दिलेलीं पुस्तकें

‘ पुस्तकं वनिता वित्तं परहस्त गतं गतम् ’ असें एक जुनें सुभाषित आहे. परंतु दुसऱ्याकडे दिलेलीं सर्वच पुस्तकें, स्त्रिया अगर पैसा नाहींसा होतोच असें नाहीं. स्त्रियांविषयीं बोलणें नाजूक म्हणून तो भाग सोडला तरी वित्त हें ( कर्जाऊ दिल्यास ) वाढण्याचाच संभव. पुस्तकें वाढत नाहींत. त्याचे चार दोन पंख कापल्या स्थितींत अगर ‘यदिचेत्पुनरायाति नष्टं भ्रष्टं च खंडितम् ’ या उत्तर चरणाप्रमाणें नष्टावस्थेंत परत येण्याचा मात्र संभव असतो.

परंतु दुसऱ्याकडे दिलेलीं पुस्तकें परत येतांना केव्हां केव्हां गंमतीचा इतिहास परत आणतात यांत शंका नाहीं. लैंगिक विषयांवरचीं पुस्तकें परत येतांना एखाद्या लग्नपत्रिकेप्रमाणें कुंकुमचर्चित होऊन परत येतात व आपण मनांत तरी समजतों कीं, या पुस्तकाला एखाद्या दांपत्याचा अगर कामप्रदेशांत नव्यानें प्रवेश करणाऱ्या युवतीचा हस्तस्पर्श झाला आहे. असलीं पुस्तकें बिछान्याखालीं ठेवून वाचलीं जात असल्यानें जातांना नवकलिकेसारखें गेलेलें पुस्तक येतांना चुरून वाळलेल्या पाचोळ्याप्रमाणें परत येतें. तत्त्वज्ञानावरचें पुस्तक पहिलीं पांचसहा पानें हाताळल्यानंतर कोऱ्या स्थितींतच येण्याची शक्यता. उलट चित्रयुक्त पुस्तक बबीपासून बाबापर्यंत सर्वांच्याच बोटांचे ठसे घेऊन प्रवेश करतें. कवितेच्या पुस्तकासंबंधीं मात्र केव्हां केव्हां मजेचा अनुभव येतो. त्यांतील प्रणयाराधनेसंबंधीं असलेल्या कवितेवर पेन्सिलीची बारीकशी खूण आढळते. केव्हां केव्हां तर द्वितीय हस्ताकडून तृतीय हस्ताकडे व तिथून परत प्रवास केलेलें हें पुस्तक घाईघाईंत

परतलें गेल्यामुळें एखादी प्रेमचिठीहि परत आणते. दोन प्रणयी युगुलांना आपल्या मूक भावना व्यक्त करण्याकरितां आपल्या पुस्तकाचा उपयोग झाला हें पाहून आनंद वाटतो. उलट एखादे वेळीं असाहि अनुभव येतो कीं, आपल्या शिकारीवर नेम धरण्याची प्रतारणा आपला मित्र करीत आहे; आणि अशा वेळीं जें वाटतें तें सावज हुकलेल्या शिकाऱ्यालाच पुसावें झालें !

पुस्तकावर वेष्टणपत्र घातलें असेल तर तें काढून मुखचित्र पाहण्याचा मोह न होणारा वाचक स्थितप्रज्ञ स्थितीला पोंचलेला असावा असें खुशाल समजावें. वक्ता व गवयी यांची वाणी ऐकावयाची असली तरी त्यांचें तोंड दृष्टीच्या टप्प्यांत असल्याखेरीज जसें आपलें समाधान होत नाहीं, तसेंच पुस्तकाचें असतें. या मनोजिज्ञासेला फारसें नांव ठेवतां येणार नाहीं. परंतु बुरखा टाकून दिलेल्या तरुणीप्रमाणें जेव्हां नग्नमुख पुस्तक परत येतें, तेव्हां अस्सल सुधारकालाहि दुःख होतें. कारण तरुणींच्या गालांवरील संस्कार परत येईतों नाहींसेहि झालेले असतात; परंतु या स्थितींत आलेलीं पुस्तकें आपल्या गालांवर अंगुलिचिन्हांचा छाप घेऊन येतात. मग मात्र आपण सावध होतों व फिरून पुस्तक देते वेळीं आलेक्झांडर डयूमाच्या लोखंडी मुखवट्याप्रमाणें पक्क्या मुखवटयानें पुस्तकाचें मुख झांकूनच मग द्यावयाचें तें पुस्तक देतों. उलट अशीहि केव्हां केव्हां गोष्ट घडते, नाहीं असें नाहीं, कीं, शेजारच्या घरांत गेलेलें मांजरीचें पोर जसें लाल फितीची गळपट्टी गळ्यास बांधून येतें, तसें पुस्तकहि सुंदरशी गळपट्टी बांधून येतें. पण हा अनुभव एकंदरींत विरळाच !

चित्रांचें पुस्तक दुसऱ्याकडे देतांना मात्र मी नेहमीच भयग्रस्त

असतों. कारण आमच्या मधुकरानें पुस्तक नेलें कीं त्यांतील चित्रांच्या बाह्यरेषा आणखी पांचसहा पानांवर उमटलेल्या असतात. चित्र कापून न घेतां पुस्तक बिघडवण्याचा हा राजमार्ग आहे. अशा वेळीं पुस्तक येतें त्यांत चित्रागणिक शेतनांगरणी केल्याचा भास होतो. या नांगरणीपेक्षां ‘ कापणी ’ करणारीं कुळें बरीं असें वाटूं लागतें.

कांहीं वाचक मात्र समंजस असतात. दात्याकरितां ते केवढी पाकासिद्धि तयार करून ठेवतात ! त्यांत पानन् पान तांबडया-निळ्या खुणा व मायेंत वाचकमहाशयांचे शेरेहि असतात. अशा वेळीं दिलेलें पुस्तक येतांना मल्लीनाथीसह येतें. आपल्या पुस्तकाची ही निघालेली सटीक आवृत्ति पाहून आनंद मानणारे दाते मात्र क्वचित् ! पण हा काय त्या वाचकांचा दोष वाटतें ? वाचकांशीं या बाबतींत बोलूं जाणें म्हणजे कृतघ्नता प्रकट करणेंच नव्हे काय ? तो बिचारा आपलें डोकें व हात यांना शीण देऊन आपलें सर्व ज्ञान त्या पुस्तकावर उमटवितो आणि आपण काय पुस्तक थोडेंसें बिघडविलें म्हणून त्याला दोष द्यावयाचा ?

एका गृहस्थाकडे मी राजकारणशास्त्रावरचें एक पुस्तक दिलें होतें. विषय राजकीय असल्यामुळेंच कीं काय तें परत आलें तेव्हां त्याला रणांगणाचें स्वरूप आलें होतें. जुनीं विधानें खोडून टाकून म्हणजे त्यांच्या कत्तलीमुळें—तांबड्या निळ्या रक्तवाहिन्याही दिसत होत्या. त्या जागीं वाचक महाशयांचीं विधानें स्थानापन्न झालीं होतीं. कांहीं कांहीं ठिकाणीं मायेंत माऱ्याच्या जागा रोखून ठेवण्यांत आल्या होत्या. कुठें कुठें ‘ अगदींच मौर्ख्य ’ वगैरे उद्गारांनीं शत्रूंची हेटाळणी करण्यांत आली होती. शेवटीं पुस्तक परत आलें तेव्हां त्या पुस्तकाचा

लेखक व माझ्या कडून पुस्तक नेलेला वाचक यांच्या द्वंद्व युद्धाच्या सामन्याचें त्याला स्वरूप प्राप्त झालें होतें.

पण इतकें असूनहि दुसऱ्याकडे पुस्तकें देणेंच मला आवडतें. पुस्तक नेणारा प्रत्यक्षाप्रत्यक्ष आपल्या घरांतील कितीतरी इंगितें मला सांगतो. त्यांची यादी द्यावयाची तर चर्पटपंजरीच होईल. त्याच्या घरांत मुलें आहेत काय, असल्यास त्यांच्या वाढलेल्या नखांची लांबी किती, तो तेल कोणतें वापरतो, घरांत घासलेटचा दिवा आहे कीं विजेचा, तोंडाला हिमालया स्नो चोपडतो काय, उघडपणें पुस्तकें वाचण्याची त्याला मनाई आहे काय, घरांत अलीकडे हळदीकुंकूं झालें होतें काय, पुस्तक ‘सह’ वाचलें जातें काय, तसें असल्यास दोघांत कधीं लढाई होते काय, वाचकांला ग्रंथाचा उपयोग लहान पोरांच्या शीर्षभेदाकरतां शस्त्र म्हणून करण्याची सवय आहे काय—थांबा, पुढें सांगत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर, तुम्हीं आपापलीं पुस्तकें तपासा म्हणजे कळेल कीं दुसऱ्याकडे दिलेल्या पुस्तकावर कितीतरी शेरलॉक हाम्सी करतां येते ती !

## तारेचे खांब

मी पुष्कळ ऐकलें होतें कीं, तो एक जाडा पंडित आहे म्हणून. वाचनालयाची यादी तपासली असती तर त्याच्या नांवावर कितीतरी जाड्या जाड्या गहन शास्त्रीय विषयांवरच्या ग्रंथराजांची नोंद सांपडली असती. त्याला मी पहात असेंहि बरेच वेळा. पण पुष्कळ दिवस त्याला वाचा आहे या विषयींहि शंका होती मला. त्याचा सर्व व्यवहार जणूं काय खूणेनें चाले. खाणावळींत सुद्धां अमुक वाढा असें त्यानें शब्दानें कधीं सांगितलें नाहीं. त्या स्तब्धतेमुळें हा मानवी पुतळा हाडामांसाचा नसून दगडाचा बनविला आहे असें एखाद्याला सांगितलें असतें तरी विश्वास बसला असता त्याचा.

‘ गंभीर सागर गंभीर असतो ’ ‘उथळ पाण्याला खळखळ फार’ इत्यादि सुभाषितें फेंकून त्याच्या मुख-स्तब्धतेचें समर्थन करतां आलें असतें. ज्ञानी पुरुषानें मौनी असावें असेंहि पुष्कळ म्हणतील. परंतु वर्ष दीड वर्षाच्या त्याच्या प्रासंगिक सान्निध्यांत आम्हीं जगाच्या एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंतच्या देशांच्या चालू राजकारणाची व वेदांपासून किर्लोस्कर मासिकापर्यंत वाङ्मयाची आमच्या अल्प बुद्धि-प्रमाणें. क्वचित पक्षाभिनिवेषानें, कधीं मिष्किलपणें, कधीं गंभीरपणें, कधीं केवळ कांहींतरी बोलायचें म्हणून चर्चा करीत असूनहि या मौनीबुवांचा एकदांहि व्रतभंग झाला नाहीं ! एका शब्दानेंहि त्यानें आमचें संभाषण फुलविलें नाहीं कीं जिरविलें नाहीं. क्वचित् त्याच्या खाकोटींत दिसणारा एखादा ग्रंथ मात्र आम्हांला सांगे कीं, हा शिला-पुरुष आजतागायत वाचतो व तो वाचतो त्याअर्थीं त्याला मतेंहि

असतील; मतें असलीं तर त्याला मनहि असेल. पण इतकेंहि असून त्या व्रतचाऱ्याला संभाषणांत गुंतवण्याचा मी मी म्हणणाऱ्यांचा प्रयत्न फुकट गेला होता. त्याची ती मुक्तता आम्हांला असह्य झाली होती.

तुम्ही वाटलें तर खुशाल असल्या महापुरुषांची स्तुति करा, परंतु मला तरी त्याची ती करणी एखाद्या गर्भश्रीमंत परंतु कवडीचुंबक मारवाड्या-इतकीच तिरस्करणीय वाटते. धन असो, कीं ज्ञान असो, त्याची देवाण घेवाण होत राहिली पाहिजे. कालचीं फुलें आज कोमेजतात व आजचीं सुद्धां निर्गंध होऊन जातात, म्हणून त्याला कांहींच महत्त्व नाहीं काय ? मतें हीं फुलासारखींच असतात. कालचीं मतें आज रहात नाहींत आजचीं उद्यां टिकणार नाहींत; पण फुलें फुललीं असतां आसमंत सुवासित करीत राहणें एवढेंच तीं जाणतात. मतांचेंहि तसेंच नसतें का ? आजचीं मतें उद्यां टिकणार नाहींत या फाजील संशयानें मुख-स्तब्ध रहाणाऱ्या माणसाच्या बुद्धींत ज्ञानाची कस्तुरी असली तरी जोंवर ती एखादी झुळुकहि सुगंधित करीत नाहीं तोंवर ती असली नसली तरी सारखीच नाहीं का ?

रस्त्यानें आपण जात असतांना तारेचे खांब लागतात. जगाचा व्यापार चालत असतो त्यांतून पण त्यांच्या हृदयाला कान लावला तरी हं आणि ऊं याहून दुसरा बोध होतो का आपणाला ? आपल्या डोक्यावरच्या तारेंतून किती महत्त्वाचे संदेश जात असतील, किती गूढें उकलत असतील, किती ठिकाणचीं किती सूत्रें खेंचलीं जात असतील, पण गंजत राहणारे ते तारेचे खांब आसमंताला एका शब्दानें तरी त्याची जाणीव देतात का ?

तसें मूक-ज्ञान्यांचें असतें ! ते केवळ तारेचे खांब असतात.

आकाशध्वनि येणारे व ऐकवणारे रेडिओचे खांब ते नव्हत. त्यांना एकच माहीत असतें कीं, वाच वाच वाचावें. एखाद्या शब्दानें एखादें मत व्यक्त करण्यालाहि ते भीत असतात. हो, आजचें मत उद्यां खोटें ठरलें तर ? उद्यांच्या वाचनांत आजचें आपलें ज्ञान फोल ठरलें तर ! पण या अतिशंकी लोकांनीं मनांत आणलें तर ते केवळ तारेचे मूक खांब राहणार नाहींत—फुलांनीं डंवरून गेलेले वृक्ष होतील आजचीं फुलें उद्यां कोमेजतील, पण आजचा सुगंध उद्यां, परवां, परवांच्या परवां सतत येत राहील !

